संगीत

# तुलसीदास नाटक

[ अंक १ ते ३ ]

लेखक

श्रीयुत गोविंद सदाशिव टेंबे

'पटवर्धन', 'वरवंचना', 'मत्स्यवेध',
'ब्रह्म-लिखित'
इ० नाटकांचे कर्ते

विजय  साहित्य

पुणें

१९२८

किंमत एक रुपया

गोविंद सदाशिव टेंबे

यांचीं

लौकरच प्रसिद्ध होणारीं

## नाटकें



संगीत

# मत्स्यवेध

अर्थात्

# द्रौपदी-स्वयंवर

## ब्रह्म-लिखित

---

**याच लेखकांचीं**

संगीत **पटवर्धन** (द्रौपदी-वस्त्रहरण), व संगीत **वरवंचना** हीं पुस्तकें 'विजय' प्रेस, ५७० शनवार, पुणें, येथें विकत मिळतील.

मुद्रक व प्रकाशक

अनंत सखाराम गोखले,

'विजय' प्रेस, ५७० शनवार पेठ, पुणें शहर.



काव्य-कलेच्या संगमभूमीवर ज्यांनीं

श्रीरामायणरूपी

सुंदर भक्तिमंदिर उभारलें

त्या महानुभाव गोस्वामी

तुलसीदास महाराजांचे

पुण्यचरणीं

ही कृति अर्पण असो.

# प्रस्तावना

आर्यावर्तांत ज्या महाकाव्यांची धर्मग्रंथांत गणना होते अशा महाभारत, भागवत, ज्ञानेश्वरी इत्यादिप्रमाणें हिंदी भाषेंतील **श्रीतुलसीदासकृत रामायण** हा एक धर्मग्रंथ मानिला जातो. आपल्या कविरत्नांच्या उज्ज्वल मालिकेकडे पाहिलें असतां असें आढळून येईल कीं, त्यांच्या अजरामर काव्याचें अधिष्ठान केवळ बौद्धिक काव्यकला हें नसून अथांग भक्तिभावदर्शक अंतःकरणप्रवृत्ति हें होय. कारण कलासक्त कवीची कृति, केवळ कलाविलासी जनांचें चित्त आकर्षण करूं शकते; परंतु भक्तिभावाच्या प्रचंड प्रवाहाबरोबर वाहत जाणारें काव्य, श्रद्धाविहीन अंतःकरणाच्या पाषाणराजींनाही भेदूं शकतें. मग श्रद्धाळु जनतेचे असंख्य वालुकाकण अशा काव्यप्रवाहांत निरंतर मग्न झाले तर नवल काय?

कला ही काव्याची पत्नी—अर्थात् काव्याच्या संसाराला शोभा देणारी सहचरी; आणि या दृष्टीनें पाहतां, सर्वस्वी कलाछंदानुवर्ती काव्य कितीही हृदयंगम झालें तरी कवीला संतमालिकेंत बसविण्याचें सामर्थ्य त्या काव्यामध्यें नसतें. कलेच्या शोभेबरोबर भक्तीचा भक्कम पाया असेल तरच त्या काव्यमंदिराला धर्मक्षेत्रांत कायमचें स्थान मिळतें. वरील दोन्ही गुणांच्या मिलाफामुळें **तुलसी-रामायण** हें महाकाव्य, उत्तरेंत धर्मग्रंथाच्या पदवीला पोहोंचलें आहे.

काव्य व कला यांचे अन्योन्य संबंध, तुलसीदास व त्यांची पत्नी या दोन प्रमुख भूमिकांच्या रूपानें दाखविण्याचा प्रस्तुत नाटकांत अल्प प्रयत्न केला आहे. प्रिय-पत्नीचा वियोग अल्पकालही सहन न झाल्यामुळें, कलेच्या मंदिरांत कवि तुलसीदास बेभान होऊन भयंकर कालसर्पावरून चढून गेले व तेथें पत्नीच्या कानउघाडणीमुळें त्यांनीं तत्काळ संसाराचा त्याग केला इत्यादि कथा आबालवृद्धांच्या परिचयाची आहे. परंतु पुन्हा पतिपत्नीचा सहवास घडवून, अखेर रामायण महाकाव्याची पूर्तता कलेच्या आत्मयज्ञामुळें झाली असा एक नवीन वळसा वरील कथानकाला देण्याची कल्पना कै० **राम गणेश गडकरी** यांचे मनांत घोळत होती.

[१] एका चित्रकाराच्यामार्फत तुलसीदास व कलावती यांचा संगम घडवून आणणें;

[२] पत्नीच्या रक्तानें तुलसीदासांनीं रामायण समाप्त करणें;

[३] हास्यरसाकरितां, घटिकापात्र गळ्यांत बांधून फिरणारें एक विरोधी पात्र निर्माण करणें.

वरील तीन सूत्रमय वाक्यांत, कै० गडकरी यांनीं तुलसीदास नाटकाच्या कथानकाची त्रोटक कल्पना, प्रस्तुत लेखकाला दिली होती. तिला अनुसरून पत्नीच्या रक्तानें रामायण लिहिण्याचा अखेरचा बिंदु साधून नाटकाची रचना उलट्या क्रमानें करणें अपरिहार्य होतें. अर्थात्, रचनेसंबंधीं किंवा नाटकांतील इतर अंगासंबंधीं जे कांहीं गुणदोष असतील त्यांची जबाबदारी माझ्यावर आहे.

यशवंत संगीत मंडळीनें या नाटकाचा प्रयोग बसविण्याचे कामीं दीर्घकाल परिश्रम घेतले, याबद्दल मी मंडळीचा अत्यंत आभारी आहें.

कोल्हापूर
१–५–१९२८

गोविंद सदाशिव टेंबे

श्री

# संगीत तुलसीदास नाटक

## मंगलाचरण

नांदी

[ सूत्रधार व पारिपार्श्वक ]

पद

**श्रीरामचंद्र कृपालु भज मन-हरण-भवभय दारुणम् । नव-कंज लोचनकंज मुखकरकंज पदकंजारुणम् ॥ ध्रु० ॥ कंदर्प अगणित अमित छबि नवनीलनीरज सुंदरम् ॥ पटपीत मानौतडित रुचिशुचिं नौमि जनकसुतावरम् ॥ १ ॥ शिरिं मुकुटकुंडलतिलक चारु उदार अंगविभूषणम् । आजानुभुज शरचापधर संग्रामजिततखरदूषणम् ॥२॥ इति वदत तुलसी-दास शंकर शेष मुनिजनरंजनम् । मम हृदय कंजनिवास कुरु कामादि खलदल भंजनम् ॥३॥** [ तुलसीदासकृत. ]

१ पारिपार्श्वक—महाराज, सेवकानें धन्याला बोध करण्याचा परिपाठ नाहीं; परंतु यापुढें ईशस्तुति लांबविणें श्रेयस्कर नाहीं; तरी आतां एकदम नाटकाला सुरवात करावी हें बरें.

सूत्रधार—काय, ईशस्तुति श्रेयस्कर नाहीं ? परंतु गायनानें सभासदांच्या चित्तवृत्ति प्रसन्न झाल्यावांचून नाटकाला आरंभ करणें हें देखील श्रेयस्कर नाहीं.

२ पारिपार्श्वक—सभासदांच्या वतीनेंच आम्ही आपल्याला ही विनंति करीत आहोंत. बाईसाहेबांनादेखील प्रेक्षकांकडून अशाच सूचना आल्या आहेत आणि या कारणानेंच रंगभूमीवर प्रवेश करून आपल्याला नाटकाचें नांव

विचारायचें, योग्य ऋतूचें वर्णन गावयाचें वगैरे सर्व प्रकार अलीकडे त्यांनीं सोडून दिले आहेत.

सूत्रधार—तुम्हांला स्त्रियांची मनोवृत्ति काय कळणार ? ती पहा माझी प्रिया सर्व शृंगार करून नेपथ्याआड उभी आहे. तुम्ही येथून जाण्याचा अवकाश, कीं "महाराज, काय आज्ञा आहे ?" म्हणून पुढें येईल. तुम्ही आपल्या कामाला जा. [ पारिपार्श्वक जातात.

नटी—( प्रवेश करून ) महाराज, काय आज्ञा आहे ? आणि या जमलेल्या सभासदांपुढें कोणतें नाटक करून दाखवावयाचें ?

सूत्रधार—वा ! पात्रांची सिद्धता तूंच केलीस आणि कोणतें नाटक करायचें तें मींच पुन्हा सांगितलें पाहिजे कां ? तुम्ही स्त्रिया परंपरेला फार चिकटलेल्या असतां ! बरें तर; या जमलेल्या रसिक प्रेक्षकांपुढें मी आज संगीत तुलसीदास नांवाचें नवीन नाटक करून दाखविणार आहें.

२. साकी

**ब्रिजभाषा वाल्मीकि विलसला तुलसीदास महात्मा । ललनाप्रेम-ललामभूत जो स्त्रीबोधें मुक्तात्मा ॥ यौवन सुरसकथा । तयाची, सुखवो धीमंता ॥१॥**

नटी—काय संतमालिकेंतील विख्यात रत्न गोस्वामी तुलसीदास यांच्या चरित्रावर नाटक ?

सूत्रधार—होय, त्यांच्या तारुण्यांतील एका सुंदर प्रसंगविशेषाचें हें नाटक आहे. कलेचीं आणि कवीचीं बंधनें किती सुदृढ असतात व कवीला कलेचें बंधन असल्यावांचून सुंदर महाकाव्यें जगतीतलावर प्रकट होत नसतात. आणि

नटी—सूत्रधाराला नटीचें बंधन असल्यावांचून प्रस्तावना संपून नाटकप्रयोग सुरू होत नसतात. म्हणून म्हणतें, आपण आतां येथून पाय काढावा.

सूत्रधार—पण तुझें नेहमींचें ऋतुवर्णन-गायन तसेंच राहील—

नटी—कलेच्या गायनापुढें माझें गायन कसलें ? ती पहा श्रीमान् दीनबंधूची मुलगी कलावती तुलसीदास कवीचें प्रासादिक पद गात आहे; कांहीं वेळ तेंच ऐकावें.

सूत्रधार—या अज्ञ सेवकाची सेवा मान्य करून घ्यावी अशी सहृदय प्रेक्षकांची एकवार प्रार्थना करून—

नटी—पण आतां निराळी प्रार्थना करण्याचें प्रयोजन नाहीं—प्रेक्षकांनीं आपल्याला पदरांत घेतलेंच आहे—चलावें. [ दोघेंही जातात.

---

# अंक पहिला

## प्रवेश पहिला

[ स्थळ—राजपूर शहरांतील दीनबंधु पाठकाच्या वाड्यामागील बगीचा.
बगीच्यांत दीनबंधु पाठकाची वडील मुलगी कलावती फुलें तोडीत
आहे व मधून मधून गात आहे; जवळच दुसऱ्या गुंफेच्या
आड्न बाल चित्रकार मदनमोहन तिला नकळत
तिचें चित्र काढीत आहे ]

२. पद

कलावती—

**देखो सखि आज रघुनाथ सोभा बनी। नीरनीरद बरन, वपुषभुवनाभरण॥ पीतांबरधनहरन द्युति दामिनी॥ध्रु०॥ मंदरपरखरी नारि आनंद भरि। निरख वर्षहि विपुल कुसुम कुंकुमकनी॥ १॥ दास तुलसी राम परमकरुनाधाम। काम शतकोटि मद हरत छबि आपनी॥२॥** [ तुलसीदासकृत.]

मदनमोहन—हां, हां. हालूं नकोस कृपा करून—

कलावती—( दचकून ) अग बाई ! कोण आहे तें ?

मदनमोहन—कलाताई, एक क्षणभर स्तब्ध राहिली असतीस तर माझं केवढं काम झालं असतं ! बरं, तो फुलं तोडण्याकरितां पुढें सरसावलेला हात पुन्हा तसाच टेव–एक क्षणभरच–जास्त नको–म्हणजे माझं काम झालं.

कलावती—फुलं तोडण्याकरितां सरसावलेला माझा हात तुझे गाल

फुलविण्याकरितां सळसळतो आहे खरा. वाः ! बराच आहेस कीं, चोरून दुसऱ्याचं चित्र काढायचं–ही कुठली रीत ?

मदनमोहन—कलाताई, तूं आतां एवढी मोठी वाढलीस, आणि तुला इतकंही समजूं नये, कीं थिरथिऱ्या माणसाचं चित्र नीट निघत नाहीं. हूं, आतां ठेव पाहूं तो हात फांदीवर–आणि उजव्या हातानं सहज एक फूल तोड–कीं झालं माझं चित्र पुरं !

कलावती—पुरे झालं तुझं–चोरून चित्र काढायचं आणि वर हुकमत चालवायची हें बरं आहे ! मी मुळींच कोणाच्या हुकमतीखालीं वागणार नाहीं. ज्याला कल्पनाशक्ति नाहीं तो चित्रकार कसला ?

मदनमोहन—हें पहा, केव्हां केव्हां डोळ्यांना दिसतं तें कल्पनेलाही मागं टाकतं. पण काय ग, तुझा हात त्या फांदीला पोहोंचूं लागला ! पाहतां पाहतां हातभर वाढलीस ! तूं इतकी उंच झाली असशील अशी मला कल्पना नव्हती ! तुझे लवकरच चार हात केले पाहिजेत !

कलावती—आणि तूं जसा कांहीं दिवसेंदिवस जमिनींतच जात चालला आहेस, नाहीं ? या फांदीच्या वर देखील माझा हात पोचतो आहे, पहा ! (हात वर करून) नीट पहा. संभाळ हो, नाहींतर वर पाहतांना मान मोडेल !

मदनमोहन—झालं माझं काम ! माझी मान खुशाल मोडूं दे आतां !

कलावती—अरे गुलामा ! मला असं फसविलंस होय ? असं करूं नये. पाप लागतं !

मदनमोहन—कलेकरितां मी कोणत्याही पापाची पर्वा करीत नसतों, समजलीस.

कलावती—पाप पदरांत बांधून एवढं त्या कलेनं काय साधलं आहे तें तरी पाहूं ?

मदनमोहन—(दूर होतो) कलेनं काय साधलं आहे तें कलेनं पाहूं नये ! तूं विचित्र मुलगी आहेस; माझ्या चित्राचे तुकडे मात्र करशील.

कलावती—अरे, इतकी का मी अरसिक आहे ? पाहूं दे तरी काय कौशल्य दाखविलं आहेस तें ! मी शपथेवर सांगतें, कीं मी तें चित्र फाडणार नाहीं—मग तर झालं ?

मदनमोहन—पोरींच्या शपथेवर कुणीं विश्वास ठेवावा बोवा !

**कलावती**—होय का आजोबा? तर मग पाहतेंच आतां कसा देत नाहींस तें! (त्याचा रंगाचा प्याला घेते.) चित्र मुकाट्यानं दाखीव-नाहींतर तुझी आणि तुझ्या चित्राची रंगपंचमी करीन!

**मदनमोहन**—माझ्यावर मात केलीस खरी. (चित्र देतो.)

**कलावती**—अरे, माझ्याइतकं दुसरं कोण तुझ्या चित्राचं कौतुक करणार? वाः! खरंच, मोठं सुबक चित्र निघालं आहे-एका बाजूला नमणारी ही लता, हीं नाजूक फुलं, वाऱ्यानं उडणारा माझा पदर-हे केंस-हें सर्व सुरेख साधलं आहे-पण मी आतां गात होतें त्यांतली एखादी लकेर या चित्रांत कुठं दिसत नाहीं ती? काय हो कुशल कारागीर?

**मदनमोहन**—हें पहा, एक कला दुसऱ्या कलेच्या राज्यांत वावरूं शकत नाहीं. गायन ही देखील एक स्वतंत्र कला आहे. म्हणूनच गायनाचे आलाप चित्रपटावर येऊं शकत नाहींत. गायनानं मैफल रंगेल, पण चित्राचा कागद कांहीं रंगणार नाहीं.

**कलावती**—अरे, तर मग तुला माहीत नाहीं. गायनाच्या ताना लिहून कागद चित्रविचित्र करणारे खटपटी प्राणी जगांत कांहीं कमी नाहींत!

**मदनमोहन**—असल्या खटपटीनं गायनकला म्हणजे एक हिशेबी अरिष्ट होऊन बसेल—

४. पद

**नच पार नादनिधिला। विधितनया वीणा वाही, तरुनि जावया। पैलतीर परि ना दिसला॥ ध्रु०॥ ब्रह्मनाद नटवी गानकला। श्रुति पंचम जी, श्रुतिसि गोचरा। स्वर-लेखनिं जरि बांधिली तिला। हीननाद होई स्वरमाला॥ १॥**

ज्या नादब्रह्मांत लीन होतांना कविकल्पनाही नादिष्ट बनून स्वतःला विसरते त्या गायनकलेचा टीचभर कागदावर कोण कोंडमारा करूं शकेल. कदाचित् एखाद्या चित्रकारानें हें धारिष्ट केलेंच, तर मला वाटतं, गायनांतील सुंदर आलापांचं रंगचित्र, सुंदर तरुणीच्या आकारानंच व्यक्त होईल. बाकी, तुझ्या-सारखी मुलगी म्हणजे गायनांतील एक अवघड तानच!

**कलावती**—वा! पाहतां पाहतां चित्रकाराचा कवि झालास; असा कांहीं

दुसरा तुलशीदास ! खरंच, आमचे गुरुजी तुलसीदासाचं फारच वर्णन सांगतात. पुढंमागं तो अलौकिक महाकवि होणार असं त्यांचं भविष्य आहे. मला एकदां पहायची आहे कसली व्यक्ति आहे ती !

मदनमोहनः—तूंहि एक व्यक्तिच आहेस ! दोघांची गांठ पडली म्हणजे तोंडातोंडी सुरू व्हायला वेळ लागणार नाहीं. खरंच, तुलसीदासासारख्या कोणातरी अलौकिक कवीशींच तुझी गांठ पडली पाहिजे ! थांब, मींच असा कोणी तरी दिव्य पुरुष शोधून काढतों. तें चित्र आण माझं—

कलावती—वाः ! हें चित्र माझं कीं तुझं ? कोणालाही विचार. एकादा आंधळासुद्धां सांगू शकेल—

मदनमोहन—हो, आणि मग एकादा बहिरासुद्धां तुझं गाणं ऐकूं शकेल, आणि वाहवा म्हणून मान डोलवील !

कलावती—गायनाचं प्रेम नसलेले सारे बहिरेच नाहीं तर काय ? आणि असे पुष्कळ बहिरट कसल्याही गायनाला उगाच माना डोलवीत असतात. तेव्हां हें चित्र माझं आहे असं कबूल कर मुकाट्यानं—

मदनमोहन—त्यांतली प्रतिमा तुझी आहे हें कबूल, पण त्यावरील मालकी माझी आहे.

कलावती—माझ्या इच्छेविरुद्ध, माझ्या प्रतिमेवरदेखील मी कोणाची-ही मालकी मान्य करणार नाहीं.

मदनमोहन—पण तूं विसरतेस, कीं ही प्रतिमा मीं निर्माण केली आहे. त्या अर्थी तिच्यावरील मालकी माझी आहे.

कलावती—ब्रह्मदेवानं मला निर्माण केली असली तरी त्याची देखील मालकी कबूल करायला मी तयार नाहीं—

मदनमोहन—ब्रह्मदेवाला दूर सारणारी पोर आईबापांची काय दशा करील तें ब्रह्मदेवालाच काय, पण परमेश्वरालाही कळणार नाहीं !

कलावती—उचलली जीभ कीं लावली टाळयाला ! परमेश्वराला कोणती गोष्ट कळत नाहीं. पण ब्रह्मदेवाला मी काय म्हणून जुमानावं ? त्याचप्रमाणं तुम्ही चित्रकार म्हणजे त्याच्या कृतींचं निर्जीव अनुकरण करणारे भाडोत्री ब्रह्मदेव. तुम्हां चित्रकारांना तरी मीं कां जुमानावं ! तेव्हां हें चित्र माझं—

मदनमोहन—मग, जुमानण्यासारखा प्राणी तरी कोण आहे या जगांत, तुझ्या मतानं ?

कलावती—कां बरं-एक कविराज!-कारण कवि, परमेश्वरी कृतींचं अनुकरण करितो. परमेश्वरी विश्वलीला म्हणजे एक अनुपम काव्य आहे.

५. पद

**आदि महाकवि ईश्वर गमला। विश्वरचनीं दावि कविलीला ॥ ध्रु०॥ मनि ईशाच्या पाहि तरंगा। मग विधि रंगवि सृष्टि विशाला ॥ विश्व नमवि शब्दें कविराजा। काय नवल नमतो इतर कला ॥२॥**

आणि म्हणूनच कविकल्पनेचा थोडातरी गंध असल्यावांचून चित्रकाराची चित्रकला नीरस ठरते तुला कविकल्पना नाहीं म्हणूनच या चित्रांत ही अर्धी अधिक जागा रिकामी राहिली आहे.

मदनमोहन—ती जागा मी मुद्दाम रिकामी टेविली आहे पण तुला ही रिकामी उठाठेव हवी कशाला ! ती तसबीर आण इकडे. ( तसबीर घेतो ) ही रिकामी जागा भरून निघाल्यानंतरच माझ्या कलेची किंमत दुनियेला दिसेल आणि मग तुझंही तोंड आपोआप बंद होईल. तुझी ही बेछूट बडबड बंद करण्याचं सामर्थ्य असलेल्या कोणा तरी तेजस्वी पुरुषाची प्रतिमाच तुझ्याशेजारीं या चित्रांत विराजमान होणार समजलीस. या चित्राला शोभा देणारा आणि तुझ्या कल्पनाशक्तीलाही सहज नमविणारा पुरुषच तुझ्या जोडीला बसण्यायोग्य आहे हें मला समजतं आणि असलाच दिव्य पुरुष मी आतां तुझ्याकरितां शोधून काढतों पहा.

कलावती—म्हणजे ! माझ्या तसबिरीचं प्रदर्शन आतां चव्हाटयावर होणार वाटतं !

मदनमोहन—उपवर मुलींची चित्रं चव्हाटयावर आलीं तर त्यांत कांहीं गैर नाहीं. नाहींपेक्षां वरसंशोधनासाठीं प्रत्यक्ष मुलीच चव्हाटयावर येतील !

कलावती—हें पहा, हा तुझा चटोरपणा मी मुळींच चालूं देणार नाहीं. हें मला अगदीं खपायचं नाहीं-सांगून ठेवतें.

मदनमोहन—कलाताई, तूं मला धाकटया भावाप्रमाणें समजतेस आणि तुझ्या तसबिरींचं प्रदर्शन मी चव्हाटयावर मांडीन असं तुला वाटतं तरी कसं ?

कलावती—तुम्ही कलेचे भक्त, लौकिकाला पारखे असतां, म्हणून भीति वाटते. कलेच्या उन्मादाला बळी पडून पापपुण्य पायांखालीं तुडविणारा कलेचा भक्त, लौकिकाची थोडीच पर्वा करणार—

[ कलावतीचा बाप दीनबंधु व धाकटी बहीण कनकांगी प्रवेश करतात.]

दीनबंधुः—आणि स्वतः तुला लौकिकाची कांहीं चाड आहे का ? उठल्या-पासून या बागेंत येऊन चकाटया पिटीत बसली आहेस ती. जोडीला हा बरा एक फुकट खाऊ मिळाला आहे तुला–कसं झालं तरी तूं कोणाची मुलगी–हा कोणाचा पोर–आपल्या आश्रयाला राहिलेल्या लोकांशीं इतकी सलगी ठेवणं आपल्या प्रतिष्ठेला शोभत नाहीं.

कलावती—बाबा, आश्रितांना भाषेनं आणि वागवणुकीनं हिणविण्यांत तरी काय प्रतिष्ठा आहे ? जगांत आश्रित कोण नाहीं ? मी तुमची मुलगी–पित्याची आश्रितच आहे.आणि आपणही कारण नसतां राजाश्रयाच्या विवंचनेंत आहांतच.

दीनबंधु—लहानपणापासून लाड झाले म्हणून तुझी जीभ फार लांबत चालली आहे. आणि मला वाटतं या बगीच्यांतील मोकळया हवेमुळं, तुझे विचारही हवेसारखे सैरावैरां धांवूं लागले आहेत. मुसलमानाच्या बिनहवेच्या गोषांतच तुला डांबून टाकिली पाहिजे–मोगल बादशहाचा जनानखानाच तुला योग्य आहे. हा बगीचादेखील मी आतां काढून टाकणार आहें; म्हणजे असला चटोरपणा करण्याचं ठिकाणच नाहींसं होईल. ही बाग म्हणजे एक नसती यातायात आहे. झाडांना पाणीच घाला, वेलींना आळींच करा, रोपांना कुंपण घाला, सतरा भानगडी ! यापेक्षां मोकळं अंगण कसं छान, वाटेल तसं वावरायला !

कलावती—मग बाबा; आम्हां मुलींना पोसायची, कपडेलत्ते पुरावायची एक यातायातच आहे आपल्या मागं. या बागेंतल्या वेलींप्रमाणें आम्हांलाही तोडून टाकलंत म्हणजे घर अंगण मोकळं !

दीनबंधु—तुम्हांला तोडायची वेळ आलीच आहे जवळ. दोघींनाही नवऱ्याच्या गळयांत अडकविल्या म्हणजे झालों मोकळा. मग कसली यातायात ? तेंच सांगायचं आहे तुला–चल घरांत—

मदनमोहन—कलाताई नवऱ्याच्या घरीं गेली, म्हणजे तिची आठवण म्हणून ही तसबीर आपल्या दिवाणखान्यांत लावावी.

दीनबंधु—( तसबीर पाहून ) अरे वाः ! ही तूं काढलीस का? शाबास. बराच हुशार झाला आहेस आमच्या इथं राहून ! पण यांत एक घोडचूक केली आहेस. दागिन्यांचा कुठं मागमूस देखील नाहीं !

कनकांगीः—खरंच–इश्श, हें काय ? गोठ–तोडे, कंठा, चन्द्रहार, बाळ्या-बुगड्या, वाक्या–बाजुबंद, बिंदि–बिजोरा, माजपट्टा, पायांत सांखळ्या–पैंजण कांहींच नाहीं !

दीनबंधु—ही असली लंकेची पार्वती काय कामाची ?

कलावती—बाबा, ही सराफाच्या दुकानांतील जडजवाहिराची जंत्री, त्या बिचाऱ्याला कोठून पाठ असणार ! शिवाय असल्या दागिन्यांचं ओझं मीं अंगावर कधीं घातलं नाहीं; आणि मला त्याची मुळीं आवडही नाहीं. मी जशी आहे तशी त्यानं चित्रांत काढली.

दीनबंधुः—तसबीर काढायचीच तर त्यांत दागिन्यांचं दैन्य दिसूं नये. मदन, सगळे दागिने काढ त्यांत आणि मग माझ्याकडे घेऊन ये; म्हणजे, दिल्लीपतीचे खानगी अमात्य–राजे जटाशंकर–यांना ही तसबीर दाखवूं ! कोणीं सांगावं, पोरीच्या नशीबाचा तारा केव्हां आणि कसा चमकेल तें ! ( मदन-मोहनास एकीकडे ) नाकांत नथीऐवजीं, मुसलमानी तऱ्हेचं मोठंसं वळं किंवा मधोमध लोंबणारा एक लांबट मोती काढता आला तर पहा. तसाच, केसांमध्यें हिऱ्याचा एक तिरपा चांद काढ; या पोरीला तो फार शोभेल. अगदीं मोगल बादशहाची बेगम दिसावी ! ( उघड ) सर्व दागिने काढून ठेव संध्याकाळपर्यंत.

कलावती—माझ्या अंगावर दागिन्यांच्या गोण्या लादण्यापेक्षां ही रिकामी जागा आहे तिथं दागिन्यांचा आणि कपड्यांचा ढीग दाखवावा म्हणजे झालं ! पाहिजे तर दागिन्यांजवळ बाबांची एक तसबीर काढ, म्हणजे मुलीची आणि तिच्या पित्याच्या संग्रहीं असलेल्या संपत्तीची सर्वांना नीट कल्पना येईल.

दीनबंधु—या संग्रहीं असलेल्या संपत्तीमुळेंच मला दिल्लीपतीच्या दरबारीं अलीकडे थोडी मानमान्यता मिळूं लागली आहे, समजलीस ! जटा-शंकरासारखे बादशहाच्या अंतरंगांतील खास मर्जींतले मुत्सद्दी उगीच नाहीं

आज माझ्या घरीं पायधूळ झाडणार आहेत ते ! शास्त्री, पुराणिक, मुनशी, गवई ठेवून तुला चारी अंगांचं शिक्षण दिलं तें या संपत्तीवांचून वाटतं ? तुझ्या हुषारीचा आणि स्वरूपाचा लौकिक दिल्लीपति अकबराच्या कानापर्यंत पोहों- चविला तो या माझ्या संपत्तीच्या जोरामुळंच, समजलीस ? संपत्तीचं महत्त्व कळत नाहीं तें माणूस कसलं ? तुला माहीत नाहीं—

६. पद

**धनसंपदा वश हो जया । नव भोगोपभोग लाभे तयां ॥ ॥ ध्रु० ॥ जनमान्यता नृपमान्यता । नच अन्य सत्ता, मिळवा- वया ॥१॥ भ्रमवि केवीं मेरु जगता । जरि कांचना धिक्का- रिता ? ॥ हरि आदरी लक्ष्मीसि तो । 'परमेश' पदवी म्हणुनी तया ॥ २ ॥**

चल घरांत, आज सायंकाळीं राजे जटाशंकर आपल्या इथं फराळाला यायचे आहेत—घरांत चला—आणि तुम्हीं दोघींहीं अंगावर चार जिनसा घालून शालू- बिलू नेसून जरा नटून सजून बसा—लवकर या—तोंपर्यंत मी दागदागिने काढून ठेवतों. ( मदनमोहनास ) मघांशीं सांगितल्याप्रमाणं संध्याकाळपर्यंत तूंही शक्य तितके दागिने या तसबिरींत काढून ठेव. [ जातो.

कनकांगी—माझी एक तसबीर काढ ना ! मीं तुला किती वेळ सांगितलं पण तूं तिकडं लक्षच देत नाहींस. आणि ताई नको नको म्हणत असतांना लपून छपून तिची मात्र तसवीर काढलीस—अहाहा ! काय पण ध्यान दिसतं आहे ! न अंगावर एक फुटका मणी. लंकेची पार्वती म्हणून बाबा म्हणाले ते कांहीं खोटं नाहीं. तूं आतां इथून जाऊं नकोस; मी आत्तां येतें सगळे दागिने घालून आणि मग राणीसारखी बसतें तुझ्यापुढं. ही इथं रिकामी जागा आहे तिथं माझी तसबीर काढ. सुरेख पिवळाधमक शालू आणि लालभडक चोळी घालून येतें.

मदनमोहन—पण तुझ्या चोळीचा लालधमक आणि शालूचा पिवळा भडक रंग या माझ्या रंगाच्या प्याल्यांत नाहीं, त्याला काय करायचं ? शिवाय तुझ्यासारखी भडक बाहुली असल्या मळकट मेषपात्राच्या जोडीला खुलून कशी दिसणार ?

कनकांगी—हें मात्र अगदीं खरं–बरं तुला सुचलं; नाहीं तर ताईमुळं माझा रंग फिक्का पडला असता. माझी आपली निराळीच तसबीर काढ कशी !–अहाहा, काय पण बावळं ध्यान !–ताई, तुला हा मदन मळकट मेष-पात्र म्हणतो–एक माणूस मेषपात्र ! !

कलावती—कोण ? मी मेषपात्र का ?

मदनमोहन—कनकांगी, तूं बरीच आगलावी आहेस कीं ! आतां काढीन का तुझं चित्र ?

कनकांगी—नाहीं काढलंस तर बाबांना सांगेन–तुझ्या रंगाचं सारं सामान फेंकून देईन–तुला घरांतून हांकून द्यायला लावीन.

मदनमोहन—हं, तेवढं मात्र करूं नकोस. तुझं चित्र काढलं म्हणजे झालं कीं नाहीं ?

कनकांगी—आतां कसा वठणीवर आलास ! मी आतां दागिने घालून येतें; तोंपर्यंत बाबांनीं सांगितल्याप्रमाणं ताईच्या चित्रांत सगळे दागिने काढून टेव. [ जाते.

मदनमोहन—कलाताई, तुझं सर्व काव्य या जडजवाहिराखालीं दडपून जाणार.

कलावती—तूं कलेचा एकनिष्ठ सेवक आहेस, तेव्हां तुझ्या हातून कलेची अशी विटंबना होणार नाहीं याची मला खात्री आहे. पण ही रिकामी जागा तूं भरून कशी काढणार ?

मदनमोहन—मी आतां लागलेंच त्या उद्योगाला पहा ! हें माझं चित्र पुरं झाल्यावांचून मला जेवणखाणदेखील सुचणार नाहीं. हें चित्र मी माझ्या चित्रकलेच्या प्रेमाकरितां तयार करीत आहें. तें या विचित्र कलेकरितां किंवा तिच्या बाबासाहेबांकरितां थोडंच आहे. उद्यां तूं सम्राटाची सम्राज्ञी हो, किंवा जटाशंकराची जगदंबा हो; पण माझ्या या चित्रपटांत तुझ्या जोडीला बसणारी व्यक्ति अगदीं स्वतंत्र असणार. त्या व्यक्तीची योग्यता राजांना किंवा राजमंत्र्यांना प्राप्त होणं शक्यच नाहीं–माझी कलाताई काव्याची मूर्तिमंत स्फूर्ति आहे आणि म्हणूनच माझ्या कल्पनेप्रमाणं तिच्या सहवासाला काव्य-मय आत्म्याचंच वास्तव्य पाहिजे.

कलावती—होय का? तर मग अशी काव्यमय मूर्ति परमेश्वर तुझ्या-पुढं आपसुक उभी करील, असा वत्सा, माझा तुला आशीर्वाद आहे. आणि अशी दिव्य व्यक्ति तुला आढळली तर मी तिच्या सहवासांत आजन्म राहून माझ्या जन्माचं सार्थक करीन अशी माझी प्रतिज्ञा ध्यानांत ठेव आणि उत्साहानं उद्योगाला लाग बरं!

मदनमोहन—ही तर मोठीच जबाबदारी टाकलीस माझ्यावर-हरकत नाहीं. परमेश्वरी संकेतावांचून आजचा हा चित्रप्रकार घडून आलाच नाहीं, खास. पहा आतां मी तुझ्याकरितां कसा जोडीदार शोधून काढतों? तूं मात्र आपली प्रतिज्ञा थट्टेवारी नेऊं नकोस. ( स्वगत ) आतां तुलसीदासांना गांठलं पाहिजे. [ जातो.

कलावती—किती मनोरम याची सरल वृत्ति! खरोखर कलेच्या निर्मल वातावरणांत वावरणाऱ्या निर्व्याज अंतःकरणाची तुलना एक भक्तराजाच्या किंवा बालराजाच्या पवित्र अंतःकरणाशींच होऊं शकेल. मीं चेष्टेनं त्याला आशीर्वाद दिला त्यामुळं त्याला केवढा तरी आनंद झाला! आणि किती उत्साहानं तो गेला! पण खरोखर जर त्याच्या कल्पनेप्रमाणं त्याला एखादा काव्यमय महात्मा भेटला तर? तर काय? बालकाच्या निर्मळ वृत्तीनं केलेली निवड कोण अमान्य करूं शकेल?

७. पद

**मनोहर मोही सहज सरल बालभाव। सुखवित किती मम मना॥ ध्रु०॥ मान्य कलावंता जी मूर्ती। मान्य जनां ही होती। कां न रुचे मग मज ती। विधिविलास सुचवी शिशुलीला सुजाण जना॥१॥**

[ पडदा.

---

## प्रवेश दुसरा

[ स्थळ—राजपुरींतील रस्ता.]

कवि भुजंग—( प्रवेश करून )—

८. पद

**बुलबूल उडे बरसात झडे, किति नीर चढे ओढे फुटले।**
**चरण कसे चिखलांत पडे, जणुं मेघ-घडे एक्‌दम फुटले ॥**

काव्यस्फूर्ति म्हणजे और बात आहे! अहाहा! "बुलबूल उडे" उडत्या कल्पनेचं मूर्तिमंत उड्डाण! मोरपंखाची भरारी डोळयासमोर उभी राहते आहे! म्हणजे कानाला दृग्गोचर होते-कवीची शब्दरचना बाळसेदार असण्यापेक्षां बळसेदार असावी. "बुलबूल-उडे बरसात झडे"-'बरसात'-काय जोरदार शब्द पडला आहे! परभाषेचे शब्द वाक्यांत जोरानं कोंबायला तसाच जोराचा अधिकार असावा लागतो-आणि धारिष्टही लागतं. "किति नीर चढे"-ओढे फुटले"-तुफान दर्यांत पोहायला पडल्यासारखं वाटतं! "ओढे फुटले"-जलमय झालेल्या निसर्गदेवतेचं हें शब्दचित्र पाहून तुलसीदासासारख्या भुक्कड कविब्रुवांचं डोकंच फुटलं पाहिजे! या तुलसीदासाला, काय वाटेल तें करून हाणून पाडल्याशिवाय माझ्या काव्याचा उत्कर्ष होणार नाहीं! "चरण कसे चिखलांत पडे"-अहाहा! अगदीं चिखलांत लोळल्यासारखं वाटतं! काय लज्जत आली आहे! किती गोड काव्य! जणुं काय मथुरेचा पेढा!- "मेघ-घडे एक्‌दम फुटले"—'मेघ-घडे'—काय समास साधला आहे! उपमा तरी किती बहारीची! मेघरूपी घडे म्हणजे मडकें—या कवीचें डोकेंही मेघाप्रमाणें आहे; काव्यबरसातीची झड लागून राहिली आहे! 'मेघ-घडे'-घड्यासारखे मेघ-एक्‌दम फुटले! छाती असेल तर माझ्या काव्याचा अन्वय लाव म्हणावं तुलसीदासाला! म्हणे रामायणावर महाकाव्य लिहितो आहे-मोठी बहाद्दुरीच कीं नाहीं! असल्या लांबलचक पुराणावर कोणीही काव्य करील. पण या कवि भुजंगाची गोष्ट निराळी आहे. चिंचेच्या पिकलेल्या पडत्या पानापासून तो सूर्यमंडळाच्या पलीकडील अज्ञात विश्वपसाऱ्यापर्यंत व वारयोषितांच्या चरणाग्रापासून तो जगन्माता जगदंबेच्या

जटेपर्यंत सर्व चराचर विश्वाला या कवि भुजंगाच्या चरणावर लोटांगण घालायला लावीन आणि सर्व स्थावर-जंगम सृष्टि माझ्या काव्यरसतरंगांत बुडवून टाकीन! तुलसीदासाला माहीत नाहीं या भुजंगाचा प्रभाव! गांवांतल्या चार पंडितंमन्य दुष्टाचार्यांनीं दाढी हालवून तारीफ केली म्हणजे कवितादेवीची शेंडी हातांत सांपडत नसते. काव्याला लागतं शब्दभांडार–" जणुं मेघ–घडे, एकदम फुटले" काय जोरदार शब्दरचना! 'एकदम' अहाहा!! " मेघ–घडे एकदम फुटले "–पण पुढें तिसरा चरण कसा जुळायचा–( पूर्वोक्त दोन चरण म्हणतो.)

घटिशेखर—( गळयांत घटिकापात्र बांधलेला व घंटा घेतलेला ) " चरण नडे, चिंतेंत पडे कवि। काव्याचे तारे तुटले "

भुजंग—आतां फक्त पुढचे दोन चरण झाले, कीं माझे चार चरण पुरे होतील, ( मयूर उडे० इत्यादि दोन चरण म्हणतो. ) तिसरा चरण जुळत नाहीं. बाकी दोन चरणांतच जर सृष्टिवर्णनाचें कार्य पूर्ण झालें तर कविस्फूर्ति तरी काय करणार–" चरण नडे "–पुढचे दोन चरण पाहिजेत. काय करावें!

घटिशेखर—( पुढें येऊन ) अहो कविवर्य, पुढचे दोन चरण म्हणजे तुमच्या तळहाताचा मळ आहे! असे अडचणींत काय पडलांत! टेका जमिनीला हात, कीं चार चरण झालेच.

भुजंग—खरंच घटिशेखर, मीं हात टेकले बोवा या सवाई वृत्तापुढं! चार चरणांचं वृत्त फार नडतं बुवा त्यापेक्षां दोन चरणांची आर्या फार सोयीची.

घटिशेखर—वाः! आर्येचे चरण कोणाला प्रिय नाहींत? म्हणूनच तर दररोज मी तिच्या लाथा मोठ्या आवडीनं घेत असतों.

भुजंग—शिव! शिव! किती ग्राम्य भाषा ही! किती गांवढळ–किती अवाच्य, किती कांहीं तरी–अधिकार नसतांना आर्येच्या चरणावरून एकदम सौभाग्यवतीच्या पदावर घसरलास? बाबा, आर्येपासून पदाची प्राप्ति करून घेण्याचा सनातन हक्क फक्त कवीलाच दिलेला आहे.

घटिशेखर—तुम्हाला आपल्या हक्काची घमेंड असल्यास माझ्या आर्येच्या चरणाचा प्रसाद मी आपल्याला मोठ्या खुषीनं बहाल करतों. सूर्यास्तानंतर बरोबर आठ घटकांनीं या–ती भोजनाची घटका आहे–म्हणजे मुष्टिमोदकाचा पहिला भर तुम्हांला मिळेल–२४ घटिका ३२ पळें चला–उद्यानाकडे मला गेलं पाहिजे—२४ घटिका ३४ पळें.

*

भुजंग—अगदीं घटका मोजतो आहेस—

घटिशेखर—मोजतों आहे म्हणजे? उगीच नाहीं! सकाळीं उठल्या-पासून माझा प्रत्येक आचार, प्रत्येक विचार या घटिमापनयंत्राबरहुकूम बांधला गेला आहे. २४ घटि ३८ पळें. फार काय; पण कांहीं आणीबाणीच्या प्रसंगीं मी पावलागणिक पळ काढीत असतों. प्रत्येक पाऊल म्हणजे पळ! याला म्हणावी शिस्त! निजणं, बसणं, जेवणं, खोकणं, शिंकणं इत्यादि सर्व कांहीं बाबतींत, घटका पळं मोजीत असतों मी. अलीकडे तर ही शिस्त माझ्या अंगांत इतकी मुरली आहे, कीं माझ्या दिनचर्येप्रमाणें हें घटिपात्रदेखील चालूं लागलं आहे. सकाळीं पहिल्या घटिकेच्या सुरवातीला निजून उठायचं असं माझं ठरलं आहे; तर दररोज सकाळीं डोळे उघडावेत तों घटका बुडलेली! कांहीं दिवसांनीं सूर्योदयदेखील माझ्या उठण्यावर अवलंबून राहील अशी मला खात्री वाटूं लागली आहे. घटिमापनयंत्राप्रमाणें ज्याचे व्यापार बांधले गेले आहेत त्याच्या मुठींत सूर्यचंद्रदेखील आले असं समजावं.

भुजंग—खुशाल समजावं–पण ध्यानांत ठेव, कीं सूर्य, चंद्र, पृथ्वी, तेज, वायु, आकाश, स्वर्ग, पाताळ, मृत्यु इत्यादि सर्व चराचर विश्वावर आम्हां कवींची सत्ता आहे. परमेश्वरानं विश्वाचा पसारा निर्माण केला, तो कोणाकरतां? —आम्हां कवींकरतां. ईश्वराचे दशावतार झाले कशाकरतां?—

घटिशेखर—गंजिफा खेळण्याकरतां—

भुजंग—मूर्ख आहेस. आम्हां कवींना काव्यं करण्याकरितां. इतकंच नव्हे तर हें अफाट विश्व आमच्या कविकल्पनेच्या भरारीला अनेक वेळ अपुरें व ठेंगू वाटल्यामुळं, सडलेल्या डबक्यांत किंवा वठलेल्या वृक्षाच्या बुंध्यावर आम्ही आमच्या काव्याचे चरण रोवून त्या विश्वाला उंच आणि विस्तृत करतों. आम्ही कवि म्हणजे सवाई परमेश्वर आहोंत, समजलास?

घटिशेखर—सवाईचे चरण जुळेनात म्हणून आर्येच्या चरणांत अद्यापि घोटाळतां आहांत; परमेश्वर अजून फार दूर आहे!

भुजंग—दूर आहे? दाखवूं तुला कविकल्पनेची भरारी?–हा पहा–गेलों गेलों–मी आतां चंद्रलोकांत विहार करूं लागलों! तो पहा चंद्र! तें पहा त्यावरील शशलांछन! ती पहा त्याची पत्नी विशाखा–अरे, दोन विशाखा! आतां मी सूर्यमंडळांत प्रवेश केला. हाय!–अंगाचा कसा दाह होऊं लागला

आहे. “सूर्यकिरण किति भाजित अंगा–कविता कविशीं घालित पिंगा!” हाय!—

घटिशेखर—अहो कविराज, खालीं पृथ्वीवर या; नाहींपेक्षां फुकट भाजून मराल!

भुजंग—अरे बाबा, मरावं तर काव्य करतां करतां तडफडून मरावं!

घटिशेखर—पण काय हो, चंद्रलोकांतून इतक्या लवकर सूर्यलोकांत कसे गेलांत? बरं झालं परत पृथ्वीवर आलांत, नाहीं तर यमलोकांत गेलां असतां.

भुजंग—अरे, कविकल्पनेला काय कठिण आहे? नाकीं गमन केलें, कीं सूर्यचंद्र कविसन्निध येतात.

घटिशेखर—बरोबर आहे. सूर्यचंद्र श्रीविष्णूचे नेत्र; तेव्हां विष्णूच्या नाकीं गमन केलं म्हणजे नेत्र जवळ यायचेच.

भुजंग—श्रीविष्णूचा उपमर्द आणि कवीची अशी विटंबना करतोस? धिक्कार असो तुला!

घटिशेखर—बरं बोवा. तुम्ही सूर्यमंडळांत भाजून मरा, नाहींतर वायुमार्गानं उडून जा. हीं पहा, २४ घटका ५२ पळं झालीं. अवघ्या ८ पळांत उद्यानाकडे पळालं पाहिजे मला. सम्राट् अकबराचे खासगी अमात्य जटाशंकर महाराज, सार्वजनिक उद्यानाची पाहणी करण्याकरितां येणार आहेत, तिकडे मौज पहायला वेळेवर गेलं पाहिजे मला; गांवभर गप्पा मारायला असा विषय मिळणार कधीं?

भुजंग—अरे पण हो. मला माहीत आहे, मीही जाणार आहें तूं माझ्याबरोबर चल म्हणजे मजा दाखवितों तुला–प्रतिनिधींपुढें तुलसीदासाची कशी रेवडी उडवतों ती. मी आतांच उद्यानांत जाऊन आलों. सर्वांच्या आधींच मोठ्या दिमाखानं तो उद्यानांत जाऊन बसला आहे. अमात्यांपुढं स्वतःची शेखी मिरवायला पहातो आहे! मीं जेव्हां त्याचा हा डाव ओळखला, तेव्हां तावडतोब अमात्यांच्या चोपदाराला गांठला आणि थोडी चिरीमिरी देऊन त्याला तयार करून ठेवला आहे. तुलसीदासानं कितीही पुढं पुढं करण्याचा प्रयत्न केला तरी अमात्यांच्या आसपास पन्नास हातांवर देखील चोपदार त्याला येऊं देणार नाहीं. अधिकाऱ्यांच्या जवळचे हे चोपदार मोठे उपयोगी असतात. तुलसीदासाच्या पुढं मी आघाडी मारतों कीं नाहीं पहा. तूं भेटलास, बरं झालं.

तूं माझ्या मागोमाग रहा आणि अमात्यसाहेबांची स्वारी जवळ आली, कीं गर्दीतून मला मागून असा लोटून दे, कीं अमात्यसाहेबांच्या पुढं मी अपशुक लोटांगण घातलं पाहिजे.

घटिशेखर—अमात्यांच्याकडे माझीही वर्णी लावाल, तर तुमची ही कामगिरी करितों. बरं चला, तीन पळं राहिलीं.

भुजंग—काय तीन पळं राहिलीं ? पण ही तुझी घटिका मघाशींच बुडली आहे.

घटिशेखर—काय, घटिका बुडली ? मुळींच शक्य नाहीं. उद्यानांत पाय टाकतांच माझी घटका भरली पाहिजे !

भुजंग—पण ती केव्हांच बुडाली आहे !

घटिशेखर—बुडाली तर अशी वर काढीन तिला. सूर्यचंद्र, दिवसरात्र जिथं माझ्या कार्यक्रमाच्या अनुरोधानं वागतात तिथं या घटिकापात्राचा पाड काय ? शिवाय माझ्या कार्यक्रमाच्या विरुद्ध वागणारी घटिका तरेल कशी ? बुडालीच पाहिजे. प्रथम तिसऱ्या प्रहरचे टोले लगावतों.

भुजंग—घटिकेच्या अपराधाबद्दल ही शिक्षा वाटते !

घटिशेखर—आणि ही तिसऱ्या प्रहराची तिसरी रेघ ( चुन्याची रेघ कपाळावर ओढतो.) आतां उद्यानांत पाऊल टाकतांच चौथ्या प्रहराची पहिला घटिका सुरू !

भुजंग—तुला कविकल्पना नाहीं; नाहींपेक्षां इथंच उद्यानांतील पुष्पांचा सुगंध दरवळून राहिला असता. आणि ही चुन्याची रेघ कपाळावर कशाला ?

घटिशेखर—प्रत्येक प्रहराला तीन तीन रेघा ! सूर्यास्तापर्यंत सर्व कपाळ सफेत रेघांनीं शोभायमान झालं पाहिजे.

भुजंग—पण या सर्व खटाटोपाचा उपयोग काय ?

घटिशेखर—अहो लोकोपयोग—माझ्या ललाटावरच्या रेघा पाहून लोकांना वेळ समजतो; पळं मी तोंडानं उच्चारीत असतोंच. शिवाय गेलेलीं संवत्सरं मनुष्याच्या कपाळावरील आडव्या आठ्यांवरून मोजतां येतात त्याचप्रमाणं गत घटींचीं उभीं चिन्हं मी कपाळावरच दाखवितों.

भुजंग—पण या घटिकांच्या चिन्हांखालीं संवत्सरांचीं चिन्हं झांकून जात आहेत. लोकोपयोगाच्या या भलत्याच भानगडींत न पडतां तूं माझ्याबरोबर चल माझा जोडीदार म्हणून.

घटिशेखर—अहो, या भलत्या भानगडीवरच माझा चरितार्थ चालतो आहे, लौकिक वाढतो आहे आणि षोक पुरा होतो आहे. या घटियंत्रामुळें निरनिराळया स्त्री-पुरुषांची ओळख होते, त्यांच्या घरीं जाऊन पुख्खा झोडायला येतो, हळुहळू त्यांचीं रहस्यं कळतात, आणि स्वतःच्या षोकाखातर तीं गांवभर पेरायला सांपडतात, आणि या माझ्या धंद्याला तुम्ही नांवं ठेवतां; दुसरा कांहीं धंदा दाखवून द्या, म्हणजे हा टाकून देतों.

भुजंग—दुसरा धंदा मी सांगतों. तूं कवि हो, निदान कवीचा नुसता हस्तक हो. मघाशीं मीं सांगितलेलं लक्षांत आहे ना? बरं, चल उचल पाय, नाहीं तर तुझ्या घटिकापळांनीं आमची घटिका चुकायची. प्रतिनिधीच्या स्वागतासाठीं कशी नक्षत्रमालेसारखी कल्पना सुचली आहे! उद्यानाकडे जातांजातां एक सवाई रचतों पहा.

घटिशेखर—आतां उचला पाय, नाहीं तर घटिका वर काढीन, आणि मग कविकल्पनेनं येथेंच उद्यान निर्माण करण्याची तुमच्यावर पाळी येईल.

भुजंग—बुडलेली घटिका वर काढण्यापेक्षां मला मागच्या बाजूनें प्रतिनिधीपुढें ढकलण्याची एकदां तालीम केलीस तर माझे पाय झपाट्यानें तरी उचलतील. हं. समज, आपल्यापुढं ही गर्दी आहे–दे मला पाठीमागून जोरानं ढकलून–मी काव्याचे चरण तोंडावर तयार ठेवतों ( घटिशास्त्री त्याला मागून ढकलतो.)

भुजंग—" बुलबूल उडे " ( कोलमडत जातो.) ठीक आहे. पडलों तर प्रतिनिधीपुढं साष्टांग नमस्कार घातल्यासारखं होईल. शिवाय त्यांचा चोपदार सांवरून घेईलच मला. चला— [ जातात.

---

## प्रवेश तिसरा

[ स्थळ—राजपूर शहरांतील सार्वजनिक क्रीडोद्यान. एका शीलातलावर तुलसीदास बसले आहेत व मदनमोहन त्यांचें चित्र काढीत आहे.]

मदनमोहन—आतां अर्ध्या घटिकेच्या आंतच मी आपली सुटका करतों.

माझं काम बहुतेक होत आलं आहे. तुलसीदासमहाराज, माझ्यासारख्या अपरिचित व अल्पवयी चिताऱ्याच्या विनंतीला मान देऊन आपण एक प्रहर एका जागेवर एकाद्या योगीराजाप्रमाणें आसन बांधलं व माझी उत्कट इच्छा अत्यंत उदारपणें पूर्ण केली याबद्दल मीं आपल्याला कितीही धन्यवाद दिले तरी ते अपुरेच ठरतील.

तुलसीदास—प्रभुरामचंद्रचरणीं सर्व धन्यवाद अर्पण असोत. दुबळ्या मानवप्राण्याची अशी कोणती निस्वार्थी किंवा निर्हेतुक कृति असते की, त्या-करितां त्यानं दुसऱ्याचे धन्यवाद स्वीकारावेत? तुझ्या निर्व्याज वृत्तीचं कौतुक करून तुझ्या विनंतीला मान दिल्यामुळं, चंचल मनोवृत्ति स्थिर करण्याकरितां प्रथम शरीराची स्थिरता आवश्यक असते, याचा अनुभव आज मला तुझ्यामुळें मिळाला. सारांश. दुसऱ्याचा संतोष राखण्यांत प्राणि-मात्राच्या स्वतःच्याच उन्नतीचं बीज असतं. फारकाय प्रभुरामचंद्रांनीं कैकेयी मातेच्या संतोषाकरितां स्वतः खडतर वनवास स्वीकारला; पण त्यामुळं प्रभूंनीं देवकार्य, नव्हे स्वतःचं अवतार-कार्य साधलं. माझ्यासारख्या स्वैर-वृत्तप्राण्यानं तुझ्यासारख्या सरळ वृत्तीच्या तरुणाला संतोषित करण्यांत माझ्या अंतिम कल्याणाचं बीजारोपण झालं नसेल कशावरून?

मदनमोहन—आपल्या या अमृतासारख्या मधुर वाणीनें माझं चित्त गुंगून गेल्यामुळं, आपलं चित्र पुरं करण्याच्या ऐवजीं मीच मात्र चित्राप्रमाणं तटस्थ झालों आहें. महाराज, या वेळची वदनावरील प्रफुल्लता कांहीं काळ कायम ठेवावी म्हणजे माझं चित्र अधिक मनोहर होईल.

तुलसीदास—आम्हां कविजनांच्या ठिकाणीं नाट्य कोठून येणार? माझ्या चेहेऱ्यावर तुला प्रफुल्लता दिसली ती केवळ प्रभु रामचंद्राच्या पुण्यस्मरणामुळं. प्रभूचं यशोगान स्वतःशीं गायची जर तूं मला मोकळीक देशील, तर माझ्या अंतर्यामींचा आनंद खास माझ्या मुखावर उमलून येईल.

मदनमोहन—आपल्याला तशी मोकळीक मी मोठ्या आनंदानं देतों. मात्र इतर कोणालाही मीं गाण्याची परवानगी खास दिली नसती, कारण गायनाच्या आलापांची कसरत आणि चेहेऱ्याची विलक्षण वक्रता यांचाच अन्योन्य संबंध सामान्यतः आढळून येतो. परंतु सहजस्फूर्तीनं हृदयांतून

निघालेलं आपल्यांसारख्यांचं भावनामय काव्यगान मूर्तिमंत सौंदर्यालाही शोभा येईल यांत संशय नाहीं.

[ तुळशीदास एक भजन गातात. चित्रकार चित्र रंगवितो.]

९. पद

रामरंगि रंगलें मन। आत्मरंगीं रंगलें। रामरूप जाहलें मन॥
विश्वरंगि रंगलें। चित्त दंग जाहलें॥ ध्रु०॥ चरणि नेत्र गुंतले।
भृंग अंबुजांतले। भवतरंग भंगले। अंतरंग दंगलें॥ १ ॥

कलावती—( मागील बाजूनें प्रवेश करून ) अहाहा! किती मोहक काव्यगान हें! या भावपूर्ण गायनानं कलेच्या गायनालाही मागं टाकलं! पण हें मी काय पाहतें! आमचा मदन खरोखरीच माझ्या तसबिरीशेजारीं परपुरुषाची प्रतिमा काढूं लागला आहे कीं काय? छे: असला हा अधिक प्रसंग मला केव्हांही खपणार नाहीं. अशीच पुढं जाऊन त्याच्या रंगाचं सर्व साहित्य उधळून टाकतें [ पुढें जाऊं लागतें इतक्यांत पडद्यांत–" दिल्लीपति अकबर सम्राटाचे खानगी अमात्य राजे जटाशंकरमहाराजांची स्वारी येत आहे. बाजूला व्हा, गर्दी मोडा, रस्ता सोडा, हात जोडा." इत्यादि भाषण ऐकते.] बरं झालं! हें याचं चित्र आतां अर्धवटच राहणार. माझा जीव आतां कसा खालीं पडला. पण माझ्या जोडीला बसण्याइतकी दिव्य व्यक्ति याला कोण मिळाली? मला जर समोरून चेहरा पाहायला मिळाला असता, तर किती मौज झाली असती! राजेश्रींची अलौकिक पुरुषाची कल्पना तरी काय आहे तें कळलं असतं आणि त्याला चिडवायला मला एक कायमचा विषय मिळाला असता. पण हें शेंडेनक्षत्र समोरून आलंच. [ बाजूला जाते.

[ कवि भुजंग, घटिशास्त्री व चोपदार प्रवेश करितात. ]

भुजंग—( चोपदारास ) तो पहा तुलसीदास तिथं बसला आहे मोठ्या ऐटीनं; जसा कांहीं दिल्लीचा बादशहाच!

चोपदार—पण मी आहेना त्याचा वस्ताद-दिल्लीचा भामट्या! आत्तांच्या आतां त्याला हुकसून देतों. तुम्ही कां काळजी करतां?

भुजंग—जुळल्यास बगीचाच्या बाहेर हांकलून द्या.

चोपदार—ठीक आहे. तुम्हीं आम्हांला खुष केलं आहे तेव्हां तुम्हांला खुष करायला आमचं काय खर्चतं. बघा तरी, दंडाला धरून बाहेर खेंचतों.

भुजंग—आम्ही आतां येथें रहात नाहीं. आम्ही येतों अमात्यांच्या पाठीमागून. आमचा यांत संबंध दिसायला नको.

चोपदार—बरं, तसं करा. मी तुमच्याकरितां मुद्दाम पुढें आलों आहें हें मात्र लक्षांत ठेवा.

भुजंग—त्याची तुम्हांला काळजी नको. [ भुजंग व घटिशास्त्री जातात.] ( भुजंग परत येऊन ) काय हो, चोपदारसाहेब, अमात्यांच्या पुढं साष्टांग दंडवत घातला तर त्यांत कांहीं गैरशिस्त दिसायचं नाहींना ?

चोपदार—वा: ! ही तर खास दरबारी शिस्त आहे.

भुजंग—तरी मला वाटलंच होतं-याला म्हणावं स्फूर्ति ! [ जातो.

चोपदार—( पुढें होऊन ) चला, बाजूला व्हा. खडे रहा, आदबसे हात जोडून उभे रहा. ( इतर लोक बाजूला होतात. परंतु तुलसीदास जागेवरून उठत नाहीं. ) उठून उभे रहा. मुजरा करायची तयारी करा. सम्राट् दिल्लीपतीचे खानगी अमात्य जटाशंकरमहाराजांची स्वारी इकडेच येत आहे. ( मदनमोहनास ) अहो चितारी, हें तुमचं काम एकदम बंद करा. आणि तुमचं सर्व सामान घेऊन आदबीनं बाजूला उभे रहा. स्वारी कदाचित् याच कुंजांत आराम फर्मावील. ( तुलसीदास उठत नाहीं हें पाहून त्यास ) अरे ए भल्या गृहस्था, तुझे कान कोठं चरायला गेले आहेत काय ? स्वारी बगीचाच्या दरवाजांतून आंत आली आणि तूं जागचा हालत देखील नाहींस ! चल ऊठ—अरेच्या ! काय मस्तवाल आहे पहा !—अरे बाबा, मुकाट्यानं बाजूला हो—नाहींतर सम्राटाच्या अमात्यांचा अपमान केल्याबद्दल विनाकारण तुला शिक्षा भोगावी लागेल.

तुलसीदास—सहल करण्यासाठीं सर्व बगीचा अमात्यांना मोकळा आहे. हीच जागा त्यांना पाहिजे असल्यास आणखी अर्ध्या घटकेनं इकडे या म्हणावं.

चोपदार—काय उर्मट आहे पहा ! दिल्लीपतीच्या खाजगी अमात्यांच्या चोपदारापुढं इतकी मुजोरी ? चल ऊठ आधीं येथून.

[ तुलसीदासाचा हात धरायला जातो.

मदनमोहन—खबरदार त्यांच्या अंगाला हात लावाल तर.

चोपदार—पोरा, काय करशील रे ? अजून ओंठावर मिसरूड फुटली

नाहीं आणि मला-या बादशहाच्या खानगी अमात्यांच्या चोपदाराला-धमकी देतोस ? तंगडीला धरून बगीच्याबाहेर फेकून देईन, माहीत नाहीं. मीं दिल्लीचा आहें, ध्यानांत ठेव.

मदनमोहन—तुलसीदासांच्या अंगाला हात लाव म्हणजे या पोराचा प्रताप तुला दाखवितों.

कलावती -( स्वगत ) अहाहा ! हेच ते कविराज तुलसीदास !

चोपदार—फिर देखो मजा-याला दंडाला धरून खेंचून काढतों. (मदन पाठीमागून एकदम झडप घालून चोपदाराला पाडून त्याच्या छातीवर बसतो.)

मदनमोहन—गध्द्या, पाहिलास या पोराचा प्रताप ? तुझ्या दाढीमिशांची मिजास दिल्लींतील लोकांना दाखव.

चोपदार—गधेकी अवलाद-मला गद्धा म्हणतोस ? तुझा बाप शोभेन मी आणि मी गद्धा काय ? तुझा बाप गद्धा ! लहान तोंडीं मोठा घांस-तुझा बाप शोभेन बाप !

मदनमोहन—खरं आहे चोपदारसाहेब—माझा चांगला चोप खाल्लात कीं नाहीं ?

चोपदार—तुलसीदास, इथून मुकाट्यानं उठा.

[ तुलसीदास लक्ष देत नाहीं. इतक्यांत अमात्य जटाशंकर आणि इतर परिवार प्रवेश करतात.]

जटाशंकर—काय आहे ही गडबड ?

चोपदार—हुजूरस्वारी येणार म्हणून मीं तुलसीदासाला अदबीनं उठून उभा रहायला सांगितलं, तों या दोघांनीं मिळून मला खालीं पाडून माझी बेइज्जत केली. मला गद्धा म्हटलं या गाढवाच्या लेकानं-याचा बाप शोभेन मी-गधे की अवलाद !

जटाशंकर—माझ्या चोपदाराची अशी बेइज्जत ? तहशीलदार, दारोगे कुठं आहेत ? (ते "जी हुजूर" म्हणून पुढें येतात.) तुमच्या तहशिलींत असल्या उर्मट बेपर्वा माणसांना थारा मिळावा याचा आम्हांला मोठा अचंबा वाटतो. प्रजाजनांच्या आरामाकरितां दिल्लीपति अकबरसम्राटानं ठिकठिकाणीं हीं क्रीडोद्यानं निर्माण केलीं आणि त्यांवर देखरेख करण्याचं काम तुम्हां प्रांता-

धिकाऱ्यांकडे मुद्दाम सोंपविलं असतां त्याच उद्यानांत अशा उद्धट लोकांना आमच्यासमोर वाटेल तो धिंगाणा घालण्याची मुभा मिळावी याचा अर्थ काय? या बाबत मला सक्त फर्मान सोडलं पाहिजे आणि अशा गाफील अधिकाऱ्यांना सजा फर्माविली पाहिजे.

तहशीलदार—दयावंत हुजूरनीं तुलसीदासाला जरूर सजा फर्मावावी. माझ्या हातून कसूर झाली खरी; तुलसीदास तिथं बसला हा माझा मोठा गुन्हा झाला; तुलसीदास पुन्हा तिथं बसणार नाहीं अशी हुजूरनीं जरूर सक्त तजवीज करावी आणि कृपावंत हुजूरनीं मला माफी फर्मावावी.

जटाशंकर—या खपेस तुम्हाला गय केली आहे. तुलसीदास, ए बदमाष, उठून उभा रहा आणि आदबकेसाथ मला तीन मुजरे कर. मला—या सम्राट् अकबराच्या खानगी अमात्याला! चल उठ.

तुलसीदास—( चित्रकारास ) अरे बाळ, तूं या कोल्हेकुईकडे मुळींच लक्ष देऊं नकोस; तुझं आपलं काम शांत चित्तानं चालूं दे. तुझ्या मनाप्रमाणं तुझं चित्र झालं म्हणजे मला सांग. या लोकांना तुझ्या कलेचं महत्त्व काय वाटणार!

जटाशंकर—काय? माझ्या—या सम्राटाच्या खास प्रतिनिधीच्या हुकुमाला तूं कोल्हेकुई म्हणतोस? यापेक्षां सम्राटाच्या सत्तेचा अधिक उपमर्द तो कोणता? याच्या पुढची पायरी म्हणजे दिल्लीपति अकबर सम्राटाचा खून करणं एवढीच शिल्लक राहिली आहे.

तुलसीदास—अमात्यसाहेब, या तरुण चित्रकाराला मी आणखी अर्धी घटिका बांधला गेलों आहें. तोंपर्यंत दिल्लीपतीचे प्रतिनिधीच काय, पण प्रत्यक्ष दिल्लीपति जरी आले तरी मी या स्थानावरून रेसभरही हालणार नाहीं. निष्कारण भाषा वाढवून त्या बिचाऱ्याच्या कामांत व्यत्यय आणूं नये. आपण बगीचांतील इतर भागांत सहल करून या, तोंपर्यंत त्याचं काम संपेल. मध्येंच व्यत्यय आणून त्याचं चित्र अपुरं राहूं देणं ही गोष्ट कलेच्या दृष्टीनं मला योग्य दिसत नाहीं. त्या बिचाऱ्याचा उगीच हिरमोड करूं नये.

कलावती—( स्वगत ) काय ही यांची वत्सलता आणि कलेवरील प्रेम!

जटाशंकर—काय, सरकारी बगीचांत सरकारी अधिकाऱ्याचा असा उपमर्द!

तुलसीदास—सरकारी बगीचांत सरकारी अधिकाऱ्याचा हा उपमर्द नव्हे,

तर सार्वजनिक बगिच्यांत सरकारी अधिकाऱ्यांचा हा उपद्रव आहे. अमात्यसाहेब, आपल्या अधिकाराचा व मानमरातबाचा दिमाख दाखविण्याचीं ठिकाणं, म्हणजे शहरांतील चव्हाटे, राजरस्ते अगर सार्वजनिक उद्यानं हीं नव्हेत; आपल्या अधिकारदर्पाचं प्रदर्शन करण्याकरितां बादशहानं स्वतंत्र टोलेजंग मंदिरं उभारलीं आहेत; त्यांतील प्रशस्त आवारांत आपण आपल्या अधिकाराचा तोरा खुशाल मिरवावा. प्रजाजनांच्या करमणुकीकरितां प्रजेच्या पैशानं निर्माण केलेल्या या उद्यानांत, आपण सामान्य नागरिकाप्रमाणंच वर्तन ठेवण्याची वृत्ति स्वीकारली पाहिजे. सार्वजनिक जागेंत दरबारी दिमाख दाखविणारे अधिकारी निष्कारण उपहासाला आणि अप्रतिष्ठेला पात्र होतात हें ध्यानांत ठेवा (चित्रकारास) काय रे बाळ, मी उठूं आतां? झालं तुझें काम! अगदीं तुझ्या मनासारखं!

मदनमोहन—महाराज, माझं काम केव्हांच झालं. माझ्यामुळं आपल्यावर मात्र अमात्यांची निष्कारण इतराजी झाली.

जटाशंकर—चित्रविचित्ररंगाच्या चार रेघोट्या ओढणाऱ्या या पोराची माझ्यापुढं प्रतिष्ठा! (तसबीर घेऊन फेंकून देतो. ती कलावती उचलून घेते.)

कलावती—(स्वगत) अहाहा, काय ही कांति! आणि प्रतिभेचं तेज! हें स्वरूपं म्हणजे एक काव्य आहे!

चोपदार—अन्नदाता, या गुढघ्याएवढ्या पाजी पोराची मला गद्धा म्हणायची काय किंमत? माझ्या मिशा बघ. तुझा बाप शोभेन, बाप. गद्धे-का बच्चा!

मदनमोहन—मिशांपेक्षां मी आपले कान पाहातों आहें. (तुलसीदास कुंजांतील शिलेवरून उठतो व त्या ठिकाणीं अमात्य बसतो.)

जटाशंकर—दिल्लीपतीशीं वैर करणाऱ्या कित्येक रजपूत राजांचे अभेद्य दुर्ग व सिंहासनं, ज्याच्या पूर्वजांनीं नुसत्या कानमंत्रानं काबीज करून दिलीं, त्या माझ्या-असल्या पराक्रमी पूर्वजांच्या अस्सल अवलादीची तूं अशी बे-अदबी करतोस?

तुळसीदास—निमकहरामी करून स्वतःच्या ज्ञातिबंधूंचीं सिंहासनं रसा-तळाला पोहोंचविण्यांत आपल्या पूर्वजांनी मोठा पराक्रम केला असेल खरा;

पण मीं सोडलेली बैठक काबीज करण्यापलीकडे आपला मात्र दुसरा कसलाही पराक्रम दिसून आला नाहीं ! [ जाऊं लागतो.

जटाशंकर—थांब, चाललास कुठं ? माझ्या पराक्रमाचा प्रभाव, याच ठिकाणीं आतांच तुला दाखवितों. तहशीलदार, माझ्या—या दिल्लीपतीच्या खास प्रतिनिधीच्या हुकमानं, या तुलसीदासाला या सम्राटाचा राज्यांतून हद्दपार केला आहे. या सीमांत नदीच्या अलीकडे याचं पाऊल पडल्यास हा देहान्त शिक्षेला पात्र होईल. या माझ्या हुकुमाचा अंमल उदईक सूर्योदयापासून सुरू होईल. या क्षणीं या हुकुमाची दवंडी या राजपूर शहरांतून व प्रांतांतील सर्व खेड्यापाड्यांतून दुमदुमून राहूं द्या. दवंडी देण्यासाठीं चांगलीं लायक माणसें निवडून काढा. या कामांत कसूर झाल्यास तुम्हांलाही हद्दपारीची शिक्षा होईल, हें ध्यानांत ठेवा.

तहशीलदार—हुजूरनीं त्याबद्दल बिलकुल फिकीर करूं नये. तसा लायक दवंडीवाला न मिळाल्यास मी तहशीलदार स्वतः दवंडी पुकारण्याचं काम बजावून माझ्याकडून झालेल्या कसुरीची भरपाई करून देईन. पण अन्नदात्या सरकारनीं माझ्यावर नालायकीचा शिक्का मारूं नये.

घटिशेखर—( पुढें येऊन ) गरीब परवर दवंडी देण्याच्या कामांला मी सोळा आणे लायक आहें, अशी मी हुजूरची खात्री करून देईन. शिवाय हे माझे मित्र मोठे भरमसाट कवि आहेत, यांचें नांव कवि भुजंग. कसलाही सरकारी हुकूम कितीही भयंकर असला तरी त्याला काव्याचा मसाला देऊन त्याची चुरचुरीत खमंग खिचडी बनविण्याची अजब करामत याचे अंगीं आहे.

भुजंग—

**भल्लकर भास्कर भीमभीषण भूमिभूषण भेरि भैरव भोग-भीम अभंग भांति। डमरु डिंडिम डिंबडंबर ढक्काढाल ढोलढुंडि॥ झंकार झटत्कार श्रीजटाशंकर जयति जयति त्रिवार जयति।**

हें मीं स्वयंस्फूर्तीनं रचलेलें शीघ्रकाव्य ! यावरून कसल्याही सरकारी हुकुमाची शोभा माझ्या काव्यामुळं किती खुलेल याची हुजूरना कल्पना होईलच !

जटाशंकर—पण या अवडंबराचा अर्थ कोणाला कळणार ?

भुजंग—अर्थ ! सरकारी हुकुमाचा अर्थाशीं काय संबंध ? शिवाय,

सरकारी हुकुमाचा अर्थ विचारण्याचं कोणीं धाडस केलं तर तो सरकारी हुकूम कसला? वास्तविक सरकारी हुकुमाचा किंवा दरबारी खलित्याचा कोणाला केव्हांही अर्थ कळतांच कामा नये. मला जर राजकवीची दरबारी जागा मिळाली तर माझे शब्द अर्थात् सरकारी झाले आणि त्यांचा अर्थ कोणाला कळणं हें सरकारला इष्ट नाहीं. त्यांतून हा घटका मोजणारा माझा दोस्त माझ्या मदतीला दिल्यास दिल्लीपति सम्राटाचा व आपल्यासारख्या पुण्यात्म्यांचा यशोदुंदुभि लाखों लोकांच्यां कर्णपथांवर आम्ही उभयतां दणाणून सोडूं.

जटाशंकर—तुमच्यासारख्या प्रतिभासंपन्न उत्साही व दरबारी धोरण राखणाऱ्या लोकांची दिल्लीपतीला केव्हांही गरज आहेच. याकरितां प्रांतिक हंगामी राजकवीच्या जागेवर तुमची, व राजपूर परगण्यांतील अव्वल दवंडीदाराच्या हुद्द्यावर, या तुमच्या दोस्ताची मी नेमणूक करतों. पण ध्यानांत ठेवा, कीं दवंडी देण्याचा मजकूर, लोकांना समजेल अशा साध्या भाषेंत असावा; व खास दिल्लीहून सुटलेली बादशाही फर्मानं, दरबारी प्रौढ भाषाकारानं व काव्यमय कल्पनेनं नटवून लोकांत जाहीर करवींत. तुम्हां दोघांनाही, या परगण्यांत कोणत्याही खासगी अगर सार्वजनिक प्रसंगीं-मजलस, जत्रा, कीर्तन, जलसा वगैरे जमावांचे ठिकाणीं आपण होऊन हजर राहण्याची परवानगी आहे. आणि सर्व जनतेला या राज्यांत होणाऱ्या सर्व महत्त्वाच्या प्रसंगांची हकीगत जाहीर करून आमचा दरारा लोकांवर बसवणं हें तुमचं काम आहे.

भुजंग—हुजूरच्याच चरणाची धूळ मस्तकावर सतत धारण करून या कृपाप्रसादाला आम्ही पूर्णपणें लायक आहोंत अशी हुजूरची आतांच खात्री करून देतों. या तुलसीदासाच्या हद्दपारीचं दवंडी काव्यगद्य मी कसं जोरदार निर्माण करतों तें हुजूरनीं ऐकावें—"एका कविब्रुव भामट्याचा धिक्कार! तुलसीदास राजपुरांतून हद्दपार! शुनः कपाले लगुड प्रहारः!!!" ऐका! ऐका!! तुलसीदास नांवाचा राजपुरांत राहणारा एक माथेफिरू सम्राटांचे खास खानगी अमात्य जटाशंकरमहाराज यांचा खून करण्याच्या उद्देशानं दगड हातांत घेऊन, उद्यानांत दबा धरून बसला होता.

जटाशंकर—पण त्यानं दगड कधीं घेतला होता हातांत?

भुजंग—तो दगडावर बसला होता, त्याचा हात दगडावर होता; दगड

हातांत असणं काय आणि दगडावर हात असणं काय, कविकल्पनेला सारखंच ! वस्तूंची उलटापालट केल्यावांचून काव्यांत रसनिष्पत्ति होत नसते.

तुलसीदास—आणि लोकावर आपत्तिही येत नसते.

भुजंग—माझ्या काव्याचा अन्वय असा लावला पाहिजे. आतां पुढें— ऐकावं हुजूर !–"तुलसीदास दबा धरून बसला होता. प्रतिनिधींच्या असामान्य प्रसंगावधानःमुळं व अतुल पराक्रमामुळं त्यांच्या जिवावरील प्रसंग टळला !"

जटाशंकर—पण माझ्या जिवावर कसलाही प्रसंग आला नव्हता !—

भुजंग—अन्नदाता ! राष्ट्रशाहीर, राष्ट्रकवि यांना राजदरबारीं मोठा मान देण्याची जी पूर्वापार पद्धत प्रचारांत पडली आहे त्याचं कारण, मवाळ मनुष्याच्या मेलेल्या अंतःकरणांत नवजीवनाची जागती जळजळीत ज्वलत् ज्योति पेटवून ती राकट राष्ट्रभावनेनं व सोत्कट स्वाभिमानानं उचंबळून, खळबळून, उसळून, सळसळून सोडण्याचं कार्य कोणी करूं शकेल, तर तो माझ्यासारखा प्रतिभाशाली कवि करूं शकेल. या तुलसीदासानं आपला असह्य अपमान केला. अधिकाऱ्यांना अपमानापेक्षां मृत्यूच्या मोक्षाची मातब्बरी ती काय ? आणि आपण जर या अपमानाचा, शौर्यानं–साहसानं, धैर्यानं–धारिष्टानं, उत्साहानं–उल्लासानं, चिकाटीनं–धिटाईनं प्रतिकार केला नसता, तर तो आपल्या मानी मनाचा मृत्यूच होता–तें एक मरण होतं–तें जगणं नव्हतं–तें जीवन नव्हतं–तें मेल्यापेक्षांही पलीकडे होतं–तें जीव टाकणं होतं–तें कांहींतरी होतं.

घटिशेखर—कां तुलसी, पटली कीं नाहीं यांच्या कवित्वाची साक्ष ?

तुलसीदास—कवित्वापेक्षां निर्लज्जपणाची साक्ष पटली खरी—

भुजंग—हा निर्लज्जपणा नव्हे, हा निर्व्याजपणा आहे. शिवाय, कवि निर्लज्ज झाल्यावांचून निसर्गदेवतेचं व चराचर सृष्टींतील वस्तुमात्राचं झांकतं झांकण हावऱ्या हातानं दूर फेंकून त्यांतील रसाळ रहस्य, जनताजनार्दनाच्या–समाजसर्वेश्वराच्या निदर्शनाला नाहींपेक्षां कसं उघड करितां येईल ? निर्लज्जपणाच काय, पण अर्वाच्यपणा, ग्राम्यपणा, चटोरपणा, आचरटपणा क्वचित् प्रसंगीं अश्लीलपणा इत्यादि भडक भावनांचा भाव, काव्याचा बाजारभाव वाढविण्याकरितां, आणि कवितादेवीचीं अव्यंग अंगं सत्रंग करून रसिकवृंदाचीं अंतरंगं आनंदविण्याकरितां कवीच्या प्रतिभाभांडारांत उदंड असावा लागतो ! तुलसीदास, तुझ्या प्रतिभेंत यांपैकीं एकही गुण नाहीं,

तेव्हां कवि म्हणून फुकट प्रौढी मिरवूं नकोस. शिवाय कवीच्या अंगीं निर्लज्ज-पणा नसेल तर सम्राटाच्या साम्राज्याचे आधारस्तंभ असलेल्या या अधि-काऱ्यांच्या—अशा या पुण्यपुरुषांच्या—या महान महात्म्यांच्या—या वीर विभूतीं-च्या धवलकीर्तीचा दिव्य दुंदुभि दुनियेंत दूरवर दाही दिशेला कसा दुमदुमून दरवळत रहाणार? हा निर्लज्जपणा नव्हे; हा कविप्रतिभेचा पराक्रमी प्रभाव आहे. हें पिळदार काव्य आहे. हा पिळपिळीत पोकळ प्रतिष्ठितपणा नव्हे! तथापि तूं स्वतःला कवि म्हणवून घेत आहेस. त्यामुळें—(जटाशंकरास) पुढील माझं दवंडी-काव्य ऐकावं हुजूरनीं "या तुलसीदासाची कींव करून त्याला देहान्त शिक्षा न देतां मेहेरनजरेनं त्यास हद्दपार करण्यांत आलं आहे. सूर्योदयानंतर तुलसीदास हा गुन्हेगार, राजपुर प्रांतांतील कोणत्याही गांवांत, खेड्यांत, रस्त्यांत, गल्लींत, घरांत, धर्मशाळेंत, देवळांत—कोठेंही दिसल्यास त्याला जिवंत धरावा अगर जिवंत मारावा. दोन्हीही कृत्यं सम्राटाच्या कायद्या-बाहेर समजलीं जाणार नाहींत; तरी कवि म्हणजे माथेफिरू असं समजून सर्वत्रांनीं त्याच्या पाळतीवर असावं. होऽऽऽ"—हें स्वयंस्फूर्तीनं तयार केलेलं निर्मल, निर्लेप, स्वच्छ साध्या भाषेंतील माझं दवंडी काव्य-गद्य, या माझ्या दोस्ता-च्या वाणींतून, घंटेच्या दणदणीत साथीबरोबर अत्यंत हृदयस्पर्शी व परिणाम-कारक होईल, हें हुजूरच्या लक्षांत आलं असेलच.

घटिश्वर—खुदावंत-मायबाप, ही घंटा दवंडीकरितां फार लहान होते. एक मोठा नगारा, बैलाच्या दोन जोड्या आणि एक गाडी माझ्या तैनातीला हुजूरनीं कृपावंत होऊन द्यावी अशी प्रार्थना आहे.

जटाशंकर—ठीक आहे—तुमच्यासारखीं उत्साही व बहुगुणी माणसं दरबारला पाहिजेच असतात. तहशीलदार, या दोघांची नेमणूक प्रांताच्या तक्त्यावर नमूद करा आणि ताबडतोब चार बैल, एक नगारा व एक गाडी यांच्या तैनातीला द्या. यांचा तनखा वगैरेसंबंधीं व्यवस्था, गांवांवर डोईपट्टी बसवून वसूल करा. या राजकवींना दरमहा शंभर अश्रफी व या दवंडी-बहाद्दरला दरमहा चाळीस अश्रफी तनखा मंजूर करण्यांत येत आहे.

तहशीलदार—हुजूर, गांवांतील लोक आधींच कराच्या ओझ्याखालीं दबून गेले आहेत त्यांना हा कर अन्यायाचा व जोरजुलमाचा वाटेल.

जटाशंकर—बस्स! ज्यास्त तक्रार नको. नाहींपेक्षां तुमच्या तनख्यांतून यांची

व्यवस्था केली जाईल. ज्या गांवीं सम्राटाच्या खानगी अमात्यांचा अपमान, उघडं उघड सार्वजनिक ठिकाणीं होतो–त्याचं प्रायश्चित्त सर्व गांवकऱ्यांना मिळालंच पाहिजे.

तहशीलदार—या दृष्टीनं गांवकऱ्यांवर कर लादायला मुळींच हरकत नाहीं.

तुलसीदास—माझ्या एकट्याच्या कृत्याकरितां माझ्या सर्व नगरवासी बंधूंना प्रायश्चित्त मिळणं अन्यायाचं आहे. मी या क्षणीं, माझी सर्व स्थावर-जंगम मालमत्ता सरकारस्वाधीन करतों. त्यांतून या दोन प्राण्यांचं पिढ्यान्-पिढ्या पोषण होईल.

जटाशंकर—ए बदमाष गुन्हेगार–एक शब्दही बोलूं नकोस. तुझ्या हद्दपारीबरोबर तुझी सर्व मिळकत सरकारजमा झालीच आहे, आणि तिची विल्हेवाट आमची अपमानभरपाई करण्याकडे होईल. तहशीलदार, दोन बैलांच्या जोड्या, नगारा, गार्डा आणि यांचा तनखा वगैरे खर्च गांवांकडूनच वसूल झाला पाहिजे.

घटिशेखर—दोन बैलांच्या जोड्यांबरोबर आणखी दोघांचा खुराक सरकारांतून सुरू व्हावा–माझा आणि माझ्या बायकोचा–म्हणजे अष्टौप्रहर आम्ही सरकारी कामाला जुंपून घेऊं.

जटाशंकर—बरं, मंजूर.–तहशीलदार, चाराऐवजीं सहा जनावरांचा खुराक द्या. सूर्योदयापूर्वी शहरभर तुलसीदासाच्या हद्दपारीची दवंडी पुकारली गेली पाहिजे–चला–कामाला लागा.

घटिशेखर—ही पहा येथूनच सुरवात करितो. ( घटा वाजवून ) ऐका, ऐका, एका कविब्रुव भामट्याची—

कलावती—( एकदम पुढें येऊन ) थांबा. अमात्यसाहेब, ही दवंडी बंद करवा आणि या महात्म्याच्या हद्दपारीचा हुकूम परत फिरवा. या पुण्य-पुरुषाच्या हद्दपारीची ही दवंडी नव्हे-पुण्यश्लोक अकबराच्या अपकीर्तीचा हा डांगोरा आहे.

जटाशंकर—सम्राटाच्या अपकीर्तीचा उच्चार करणारी जीभ छाटून टाकली जाईल. आम्ही अधिकारी सम्राटाच्या विमल कीर्तीच्या जिवंत ध्वजा फडकत असतांना, एवढ्या बेमुर्वतखोरपणानं, जीभ लांब करून बोलणारी तूं कोण ?

प्रत्यक्ष अमात्याच्या हुकुमाला विरोध करण्याचं धारिष्ट येथील स्त्रियांच्या अंगीं असेल अशी आम्हांला कल्पना नव्हती.

कलावती—निरपराधी प्रजाजनांना निष्कारण दंश करणारे कृष्णसर्प, बादशाही छत्राच्या छायेखालीं निर्घोर वावरत असतील अशी आम्हांलाही कल्पना नव्हती.

जटाशंकर—तुलसी, ही तरुण स्त्री तुझ्या तालमींत तयार झालेली दिसते. इतकी मुजोर, बेमुर्वतखोर मुलगी मीं कधींच पाहिली नव्हती. तूं कुणाची कोण, बोल. ( स्वगत ) काय हें सौंदर्याचं तेज !

कलावती—सत्ताधिकाऱ्यांच्या पूर्ण परिचयाचे येथील धनाढ्य नागरिक दीनबंधु पाठक यांची मी मुलगी. माझं नांव कलावती.

जटाशंकर—काय, जिच्या लावण्याचा लौकिक दिल्लीपतीच्या दरबारापर्यंत जाऊन पोहोंचला आहे, तीच तूं श्रीमान् दीनबंधूची कन्या ! तुझ्या या उत्कट भावना तुझ्या सौंदर्याला व तारुण्याला तेज देत नाहींत असं कोण म्हणेल ! परंतु स्त्रीजातीच्या स्वाभाविक मर्यादेचं उल्लंघन केल्यानं तेंच सौंदर्य तिरस्करणीय ठरतं हें तुला माहीत नाहीं. मुद्दाम मला इथं पाठविण्यांत सम्राटाचा काय हेतु आहे हें जर तुला माहीत असतं तर असं अविचाराचं वर्तन माझ्यासमोर तूं केलंच नसतंस. कदाचित् सम्राटाची इच्छा व माझ्या येण्याचा हेतु तुझ्या पित्यानं तुला कळविला नसेल.

कलावती—आर्यकन्या यवन-सम्राटाच्या जनानखान्यांत लोटूं पाहणाऱ्या जन्मदात्याला पिता म्हणण्याची मला जितकी लाज वाटते, तितकीच असले अधम धंदे करून सम्राटाची मर्जी संपादन करणाऱ्यांना अकबराचे अमात्य म्हणण्याचीही मला लाज वाटते. माझ्याविषयींचा प्रश्न बाजूला राहूं द्या; परंतु या पुण्यविभूतीला, अकबराच्या राज्यांतील या तेजस्वी कविरत्नाला हद्दपारीची शिक्षा देऊन आपण सम्राटाच्या लौकिकाला कलंक लावीत आहां.

तुलसीदास—बादशाही कृपेच्या कर्दमांत लोळणाऱ्या या डुकरापुढें असलीं तेजानं तळपणारीं माणिकमोतीं कशाला उधळीत आहेस ? अधिकाराचं व मानमरातबाचं आमिष दाखवून, तुझ्या पित्याकरवीं तुला सम्राटाच्या जनानखान्यांत लोटूं पाहणाऱ्या या नराधमाच्या अंतःकरणाचा ठाव तुला कसा लागणार !

जटाशंकर—तुलसी, तूं हद्दपार झालेला गुन्हेगार आहेस, हें लक्षांत ठेव. जिभेला हद्दीबाहेर जाऊं देऊं नकोस.

तुलसीदास—हद्दपार झालेल्याची जीभ हद्दपार गेली तर त्यांत नवल काय? वीतभर परगण्याच्या टचभर आवाराबाहेर मला हद्दपार करण्यांत मोठं शतकृत्य केलं असं आपल्यासारख्या दिल्लीच्या दरबारी डबक्यांतील बेडकांना वाटणं साहजिक आहे. परंतु रामचंद्रचरणाचा महिमा गाणाऱ्या माझ्यासारख्या कवीला, निसर्गाच्या अवाढव्य हद्दीची देखील पर्वा नसते; मग असल्या हद्दपारीची मला काय पर्वा वाटणार?

१० पद

**प्रभुपदपंकजलीनां, कवींना। बंधन कीं स्थल कालहि साहेना ॥ धृ० ॥ नच धना, नच मदांधा जनां। कविजन मानी। सेवोनी राघव-नाम-सुधा करोती सुगाना ॥ १ ॥**

जटाशंकर—उद्यां सूर्योदयापर्यंत ही तुझी बडबड चालेल. त्यानंतर या राजपूर प्रांताच्या हद्दींत तुझं पाऊल, म्हणजे मृत्यूच्या आवारांत पाऊल ठेवण्यासारखें आहे हें खूप समज.

कलावती—प्रतिनिधीसाहेब, दया करा, आणि अजूनही आपला हुकूम परत घ्या. या अन्यायी कृत्यानं आपल्या काल्पनिक अपमानाची भरपाई न होतां सम्राटांच्या कीर्तीला कायमचा कलंक लागणार आहे इकडे लक्ष द्या.

जटाशंकर—सम्राटांच्या अधिकाऱ्यांचे हुकूम केव्हांही विचार करून आणि स्वतःची जबाबदारी ओळखूनच दिलेले असतात, आणि म्हणून ते केव्हांही न्यायाचेच ठरतात वरचेवर सम्राटाचं नांव उच्चारून असल्या क्षुद्र गोष्टीला महत्त्व देण्याचं कांहीं कारण नाहीं. तूं आणखी कितीही वाद घातलास तरी माझ्या तोंडून निघालेल्या हुकुमांत बदल होणं शक्य नाहीं. माझा हुकूम न्यायाचा असो अगर अन्यायाचा असो, तो माझ्या इभ्रतीकरतां अमलांत आलाच पाहिजे. ती तुझ्या हातांतील तसबीर आण इकडे. हद्दपार गुन्हेगाराची चेहेरेपट्टी सरकार जमा झालीच पाहिजे. आण ती तसबीर इकडे—

**कलावती—प्राण गेला तरी ही तसबीर मी देणार नाहीं.**

**जटाशंकर—तसबीर देणार नाहीं? ही तसबीर मीं फेंकून दिली त्याच—**

वेळीं सरकारी अधिकाऱ्याच्या स्पर्शानं ती सरकारजमा झाली आहे, आणि कायद्याप्रमाणं ती सरकारी अम्मलदाराच्या हवालीं करणं तुला भाग आहे.

कलावती—सरकारी अंमलदार अगर दरबारी अमात्य–कोणालाच मी भीक घालीत नाहीं. मांसखंडाला लगटणाऱ्या गिधाडानं उडवून दिलेलं हें रत्न माझ्या हातीं लागलं आहे. या तसबिरीवर सत्ता माझी आहे.

जटाशंकर—सरकारीसत्तेला विरोध करण्याच्या कलमाखालीं तुला गिरफदार करून बादशहापुढं उभी करण्याचं कर्तव्य मला बजावावं लागेल हें ध्यानांत ठेव. मोठ्या सन्मानानं तुला बादशहाकडे घेऊन जाण्याकरितां मी मुद्दाम इथं आलों; परंतु तुझ्या वडिलांनीं पत्रांत वर्णन केलेल्या तुझ्या माथेफिरू व हट्टी स्वभावाचा मला जो आतांच अनुभव आला, त्यावरून तूं गुण्यागोविंदानं सम्राटाच्या इच्छेला मान देशील असं चिन्ह दिसत नाहीं. आरोपी या नात्यानं तुला सम्राटापुढं उभी करण्याची संधि तूं मला आपण होऊन देत आहेस, हेंही एका अर्थी बरंच झालं.

कलावती—( स्वगत ) या दुष्टानं असा डाव टाकला काय ? आतां दुसरा उपायच नाहीं. ( प्रकट ) प्रतिनिधिसाहेब, आपल्या डोळ्यांवर अधिकाराची धुंदी चढली आहे. हें चित्र नीट पहा आणि आपल्या सम्राटांनाही दाखवा.

पद

मदांधा जनां,सुविचार सुचतीच ना, लज्जाविहीनां ॥धृ०॥
धर्मांतका उद्धत्ता धूर्ता। नृपराज अर्पोनि अनिवार सत्ता॥
सन्मार्गगामी जनां यातना देति नाना ॥ १ ॥

पतीला अन्यायानें हद्दपार करून त्याच्या पत्नीला आपल्या जनानखान्यांत खेंचणाऱ्या नराधमांपैकीं अकबर सम्राट् खास नाहीं. अमात्यसाहेब, हें चित्र डोळे फाडून पहा.

तुलसीदास—काय ! काय हा वेडेपणा—ही गोष्ट मी केव्हांही—

जटाशंकर—तुलसीदास एक शब्दही या कामांत तूं बोलूं नकोस तुझ्या नीचपणाची कमाल झाली.

तुलसीदास—मी जर या वेळीं न बोलतां स्तब्ध राहिलों तर एका जीचा निष्कारण बळी घेतल्याचं पातक माझ्या मस्तकावर चढेल. मी बोलणारच.

जटाशंकर—तूं काय बोलणार तें मला माहीत आहे. तुझ्या अधम-पणाची साक्ष ही तसबीरच देत आहे. एक शब्द बोललास तर इथंच माझ्या तरवारीला बळी पडावं लागेल.

तुलसीदास—खुशाल माझा प्राण घ्या; पण माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत—

कलावती—महाराज-नाथ-मला एवढं चुडेदान द्या, आणि आपण एक शब्दही कृपा करून बोलूं नका.

तुलसीदास—पण हा तुझा आत्मयज्ञ मी मुकाट्यानं मान्य करूं ?

कलावती—नाथ, पतीच्या काव्यप्रतिभेप्रमाणं, पत्नीची प्रेमप्रतिभाही स्थलकालाचे निर्बंध झुगारून तितक्याच वेगानं भरारी मारूं शकते. आपण कृपा करून स्तब्ध रहावं. माझं हात जोडून एवढंच मागणं आहे.

जटाशंकर—( स्वगत ) सम्राटाची मर्जी वळवून घेण्याकरितां मीं योजिलेला हा डाव असा आडवा पडला. कांहीं हरकत नाहीं. ( प्रगट ) तुलसी, तूं या क्षणीं या शहराच्या हद्दीबाहेर चालता झाला पाहिजेस.

तुलसीदास—आपल्या हुकुमाची अंमलबजावणी उद्यां सूर्योदयापासून व्हायची आहे. मन मानेल त्याप्रमाणं क्षणाक्षणाला हुकूम फिरविणं आपल्याला शक्य नाहीं. [ पडद्यांतः—उद्यां सूर्योदयापासून तुलसीदासकवीला हद्दपार केलं आहे.] ती दवंडी नीट ऐका.

कलावती—नाथ-माझी प्रार्थना व्यर्थच झाली म्हणायची.

जटाशंकर—तुलसी, आज सूर्यास्ताबरोबर तुझाही अस्त व्हावा अशी आमची इच्छा होती, पण रात्रीच्या चार प्रहरानं कांहीं बिघडत नाहीं. मात्र सूर्योदयाबरोबर आमच्या हुकुमाचा अंमल सर्वत्र जारी होईल, हें ध्यानांत ठेव. ( तसबीर फेंकून जाऊं लागतो. उद्यानाचा अधिकारी तहशीलदारामार्फत हारतुरे पुढें करतो, त्याला झिडकारून ) तुम्हांला कांहीं काळवेळ समजत नाहीं ? [ रागानें जातो. त्याच्या परिवारांतील व इतर लोक त्याचे मागून जातात.]

तहशीलदार—( मदनमोहनास, त्याच्यापुढें फुलांचे हार फेंकून ) हे हार आतां तुझ्या तुलसीदासाच्या गळ्यांत घाल आणि तूंही जा त्याच्यामागें भीक मागत. [ जातो.

मदनमोहन—( हार उचलून घेतो.) कसं माझ्या मनांतलं बोललांत !

(फुलांना उद्देशून) माझ्या बचड्यांनो, अमात्यासारख्या दुष्टाच्या गळ्याला बिलगण्यासाठीं देवानं तुम्हांला खास निर्माण केलं नाहीं. [ कुंजाआड जातो.

तुलसीदास—तेजस्वी कुमारिके ! हें तूं काय केलंस ?

कलावती—महाराज, शरीरानं मी कुमारिका आहे खरी, पण मनानं, वाचेनं आणि लौकिकानं आतां मी आपली सहधर्मिणी-पत्नी झालें आहे. आतां मला कुमारिका म्हणणं म्हणजे मला माझ्या सिंहासनावरून दूर लोटून माझा अपमान करण्यासारखं आहे. माझ्या पति-दैवताकडून सुद्धां असला अपमान मी सोसायला तयार नाहीं. पुन्हा मला कुमारिका नाहीं म्हणायचं. नाहीं ना गडे—( स्वगत ) माझ्या तोंडांतून काय भलताच शब्द गेला !

[ मदनमोहन हलकेच जातो.

तुलसीदास—" गडे ! " अहाहा ! दोन अक्षरांचा एकच शब्द-पण त्यांत काय ब्रह्माण्ड भरून राहिलं आहे ! खरोखर पुरुषांच्या हृदयदुर्गांतील निर्बल स्थलांचा नकाशा, विधात्यानं जन्मतःच स्त्रियांच्या हातीं दिलेला असतो खास. होयना ? काय मोहिनी घातलीस-" गडे "-या एका शब्दानंच मला आपला गुलाम करून टाकलंस !

कलावती—( स्वगत ) आतां यांच्याशीं यांच्या तऱ्हेनंच बोललं पाहिजे. ( प्रगट ) मग आपण गुलाम झालांत ना ! खरं खरं सांगायचं गडे—

१२. पद

**आजि गडे पुरवा, कोड-हृदयिंचें, निजनाथा ॥ ध्रु०॥**
**विनवी ही नतदासी, जोड चरणिंची, द्या कांता ॥ १ ॥**
**श्रवणिं पडो अनमोल बोल नवलसा । सुखदाता ॥ २ ॥**

तुलसीदास—पुन्हा तोच शब्द ! तीच जादू-तोच पाश ! ! छेः ! मी कवि आहें. मी कोणाच्याही बंधनांत सापडणं शक्य नाहीं. मी फक्त प्रभुरामचंद्र-चरणांचा गुलाम आहे.

कलावती—प्रभुरामचंद्र म्हणजे मूर्तिमंत प्रेमावतार. दुष्टांचं निर्दालन करण्याचं अवतार कार्य, प्रभूंनीं पत्नीप्रेमाचं निमित्त पुढें करूनच घडवून आणलं ना ! आपण प्रभुरामचंद्राचे प्रेमी, रामप्रभु पत्नीचे प्रेमी ! मी आपली पत्नी-अर्थात् आपण माझे प्रेमी ! अगदीं सरळ हिशेब आहे. होय कीं नाहीं ? सांगायचं गडे.

तुलसीदास—" गडे " म्हणूं नकोस कृपा करून. मला कससंच होतं. तुझं तर्कशास्त्र तुझ्या रूपाप्रमाणं दुर्निवार आहे खरं, परंतु मुख्य सिद्ध करायची गोष्ट तूं गृहीत धरून चालली आहेस.

कलावती—ती मीं सिद्ध केली असं आपणच कबूल करतां कीं नाहीं पहा.

तुलसीदास—आपलं म्हणणं पुरुषांच्या गळीं उतरविण्याची कला बायकांना पुरी अवगत असते हें मला कबूल आहे. पण तूं माझी पत्नी झालीस हें कसं सिद्ध करणार ? याला प्रत्यंतर काय ?

कलावती—( चित्र दाखवून ) हें पहा प्रत्यंतर—यानंतर आपल्याला व मला पति पत्नी होण्यावांचून कांहीं गत्यंतर आहे का ?—सांगायचं—

तुलसीदास—बस्-बस् पुढचा शब्द बोलूं नकोस.

कलावती—ही गोष्ट प्रतिनिधींनीं पाहिली, राजमंत्र्यांनीं मानली आणि म्हणूनच निरुत्तर होऊन निमुटपणें त्यांनीं येथून पाय काढला; अर्थात् ही गोष्ट आतां राजमान्य झाली.

तुलसीदास—( तसवीर पाहून ) त्या चितार्‍याच्या पोरानं मला असं फसविलं काय ? तीराप्रमाणं तेजस्वी व सरल वृत्तीच्या तुझ्यासारख्या तरुणीनं असल्या अयोग्य कृत्याला संमति द्यावी हें अत्यंत अनुचित आहे. तुझ्या मनाला या कृत्याबद्दल कांहींच विधिनिषेध वाटत नाहीं ?

कलावती—महाराज, विधीचा निषेध कोण करूं शकणार ? दोन जीवांना बांधण्याकरितां विधात्यानं अचुक टाकलेला हा पाश कोण तोडूं शकणार ?

१३. पद

**परम गहन पाशां, विधिच्या कोण चुकवि । मनुज घेरि दुराशा ॥ धृ० ॥ प्रणयपाश गळिं पडला । जीव जिवां सांपडला ॥ परिणय दृढबंधन तरि उभयांला । गति दे अविनाशा ॥ १ ॥**

यांत माझी संमति कोणीं विचारली आणि आपली संमति तरी कोण विचारणार ?

तुलसीदास—एका अप्रबुद्ध पोराच्या बालिशपणाचा फायदा घेऊन, तुझ्यासारख्या बालिकेला माझ्यासारख्याच्या अनिश्चित, अव्यवहारी आणि अकिंचन जीविताची वांटेकरी करून, तुझ्या जन्माच्या सुखाची वाट लावण्याचं

पातक माझ्याकडून होईल असं तुला वाटतं ? तुझं स्पृहणीय सौंदर्य, मनावर मोहिनी पसरणारं रसिक व चतुर भाषण आणि कवित्वत्तीलाही गुंगविणारी तुझी सरळ तेजस्वी वृत्ति, हीं सर्व या वेळीं माझ्या अंतःकरणांत अपूर्व उत्साह उत्पन्न करीत आहेत; किंबहुना संसारसुखाचा अमर्यादनिधि माझ्या हस्तगत आहे असं माझं मन मला सांगत आहे. तथापि, केवळ या चित्रप्रकारामुळं अनन्यगतिक झालेल्या तुझ्या बावरलेल्या बालवृत्तीचा फायदा घेऊन, हद्दपार झालेल्या गुन्हेगाराबरोबर तुझ्या जीविताचे धिंडवडे काढण्याचं पातक मी कधींही करणार नाहीं. प्रथम त्या चित्राचे तुकडे कर आणि घरीं जाऊन—

कलावती—काय, या चित्राचे तुकडे करूं ? ज्या चित्रांतील आपल्या प्रतिमेच्या निकट सहवासामुळं, या चरणांची जन्मभर सेवा करण्याचा हक्क मी मिळविणार, त्या या चित्राचे तुकडे करून चार दिशेला फेंकून देऊं ? त्यापेक्षां या माझ्या देहाचीं शतशः खंडं करून त्यांतील रक्ताच्या बिंदुमात्रांत सांठविलेल्या पतिप्रेमाच्या सुगंधानं दाही दिशा मी दरवळून टाकीन.

तुलसीदास—हा पतिप्रेमाचा सुगंध नव्हे-हा प्रक्षुब्ध वृत्तींतील क्षणैक उन्माद आहे.

कलावती—महाराज ! उन्मादावांचून सृष्टींतील कोणती वस्तु विकास पावते ? वसंतऋतूंतील उन्मत्त वायूच्या प्रभावानंच वृक्षलता कुसुमित होऊन आपल्या प्रफुल्ल पुष्पांचा सुगंध पृथ्वीवर पसरतात ना ? आम्रासव पिऊन उन्मत्त झालेल्या कोकीलकूजितामुळेंच उद्यान सजीव होतं ना ? फार काय पण कविस्फूर्तीचा उन्मादच, अनुपम व अविनाशी काव्यं निर्माण करूं शकतो ना ?

तुलसीदास—तुझ्या या दिव्य वाणीवरून असं वाटतं कीं, स्त्री-प्रेमाच्या सुगंधाचा अल्पांश घेऊन त्यापासून परिमल व स्त्री-हृदयांतील कोमलता, रक्तता व स्निग्धता इत्यादि इतर गुणसामग्री उसनी घेऊन त्यापासून विधात्यानं पुष्पं निर्माण केलीं असावींत !

कलावती—हा पहा, प्रतिभेचा उन्मादच आपल्या वाणींतून हें रसभरित रम्य काव्य वदवीत आहे. मग मी म्हणतें, उन्मादानं उमलणारं सुंदर पुष्प जसं रसिकांच्या उत्तमांगावर विराजमान होऊं शकतं, त्याचप्रमाणं उन्मादानं विकास पावलेलं स्त्रीचं प्रेम तिला पत्नीरूपानं कवीच्या अर्धांगावर कां विराजमान करूं शकणार नाहीं !

तुलसीदास—काव्याच्या उन्मादनं भ्रमण करणाऱ्या मस्तकाखेरीज कविला दुसरं अंगच नसतं. नुकतंच उमललेलं सुकुमार पुष्प, काव्यमदानं क्षणभर डोकीवर धारण करणारा कवि, त्याच पुष्पाला पायांखालीं तुडवून त्या मृत पुष्पावर काव्य करायला मागं पुढं पहात नसतो. याकरितां तूं कवीच्या नादीं लागूं नकोस.

१४. पद

**आकिंचना कवीसि या वरोनिया। जाइ जन्म वाया ॥**
**वनांतरीं, निरंतरीं, त्वदंतरीं। काय सौख्य व्हाया ? ॥ ध्रु०॥**
**दुराराध्य, विख्यात सुकविमति। स्वच्छंदवृत्ति, असंबद्ध कृति ॥ धुंद चित्ति जगता धिक्कारिति। संसार नेटका रुचे न यां ॥ १ ॥**

कलावती—महाराज ! केवळ माझी निराशा करण्याकरितां, चुरलेल्या फुलांवर किंवा पिकलेल्या पानांवर काव्य करणाऱ्या क्षुद्र कवीच्या जोडीला आपण स्वतःला बसवीत आहांत. पण मी अशानं फसणारी नव्हे. आपण सत्कवि आहांत; महाकवीची दिव्य प्रतिभा आपल्या ठिकाणीं पूर्णपणें वास करते आहे हें मला माहीत आहे. नाहींपेक्षां रामायणासारख्या दिव्य चरित्रावर काव्य करण्याचं बिकट काम आपण हातीं घेतलंच नसतं आणि जरी कदाचित् चुरलेल्या पुष्पाला पाहून आपली प्रतिभा जागृत होत असली तरी निर्माण होणाऱ्या काव्याच्या पूर्ततेकरितां कोणतं पुष्प, फार काय कोणती स्त्री आपल्या जिवाची त्या काव्यावरून कुरवंडी करणार नाहीं ?

तुलसीदास—इतर स्त्रियांची गोष्ट मला माहित नाहीं; परंतु तुझ्यासारखी एकादी स्त्रीदेखील, अखिल स्त्रीजातीला धन्यता आणण्यास समर्थ होईल यांत संशय नाहीं. परंतु स्त्रीचा मोह म्हणजे स्वतःची कार्यहानि !

१५. पद

**चतुर मधुरवचन तेवि, रुचिरवदन मोही। सुमुखी, तुजसि वरिन जरी कार्यनाश होई ॥ ध्रु०॥ सुरनंदिनि तूं बाला। हीनभाग्य मी असला। विषमयोग उभयांला। असुखि लोटी सुगति नाहीं ॥ १॥ नवविलास रमणीचा। पर्वकाळ रसिकांचा। परि विनाश करि त्याचा। कार्यभार जो वाही ॥ २॥**

तुझ्यासारख्या रमणीरत्नाला दूर लोटणं मला कितीही दुःसह वाटत असलं, तरी संपन्न पित्याच्या घरीं सुखविलासांत वाढलेल्या तुझ्यासारख्या कुसुम-कोमल बालिकेला हृद्पारींतील वनवासाचे खडतर कष्ट भोगायला लावणं हें मला केव्हांही मान्य नाहीं. शिवाय, आतांच पाहिलेल्या अधिकाऱ्यांच्या अत्याचारांमुळं, मला आमच्या आर्यधर्मावरील संकटाची जाणीव अधिक तीव्रतेनें भासूं लागली आहे. अधिकाऱ्यांचा हा राक्षसी विलास आणि आर्य-धर्माचा उच्छेद करणारी ही त्यांची रावणी राजनीति, या दोन्हीं गोष्टींकडे आम्हां आर्यांचं लक्ष वेधणं अगत्याचं आहे. धार्मिक भावना प्रदीप्त केल्या-वांचून राष्ट्राला जिवंतपणा येत नसतो. रामचरितमानस ही भावना निर्माण करील अशी मला खात्री वाटते. आणि म्हणूनच हें रामायण महाकाव्य मीं रचावयास सुरुवात केली आहे व तें रामनवमीच्या पुण्यप्रसंगीं प्रगट करण्याचा मीं संकल्प केला आहे. भक्तांचा संकल्प म्हणजे भीष्मप्रतिज्ञा ! अशा वेळीं बायकोची बेडी म्हणजे कार्यनाश नव्हे का?

कलावती—महाराज बायकोची बेडी म्हणजे पूर्वपुण्याईची जोडी—ही प्रेम सुवर्णाची बेडी आहे; हृदयांच्या ऐरणीवर पुण्याच्या हातोडीचे घाव घालून ही घडविलेली असते. या बेडीच्या भारानं कवीचं पाऊल बेताल न होतां अधिक भारदस्तपणानं मात्र पडतं. महाराज! आपलं काव्य या कलेच्या सहवासानं अधिक गंभीर व अधिक रसाळ होईल असा मी निर्वाळा देतें.

तुलसीदास—तूं कांहीं म्हटलंस तरी तुला मी माझ्या वनवासांतील कष्टां-ची भागीदारीण करूं इच्छीत नाहीं.

कलावती—महाराज, सीतापति श्रीरामचंद्र आपलं उपास्य दैवत आहे. इष्ट देवतेचं अल्पांशानं तरी अनुकरण करणं हीच खरी उपासना नव्हे का? त्रिभुवनांतील सर्व भांडार जिच्या पोटांत खचलेलं आहे अशा वसुंधरेच्या उदरीं सीतादेवी जन्म पावली; असं असूनही, अखिल स्त्रीजातीला आदर्श झालेल्या त्या माउलीनं, पतिसमवेत वनवासाचे खडतर कष्ट सोसण्यांत धन्यताच मानली ना? इतकंच नव्हे, तर प्रभूचं अवतारकार्य सत्वर सिद्ध होण्याला जानकी मातेचाच उपयोग झाला ना?

१६. पद

**जाया कां अवमानिता?। वाया कां विनति, नाथा! ॥ ध्रु०॥ दशवदनारि नेइ कांतारीं। दीन वदन कांता। मग मज आपण कां त्यजितां॥ १॥ इष्ट दैवता तुष्ट करावें। अनुसरोनि आतां। न्या मज सवें सदय कांता! ॥ २॥**

खरंच, वनवासाला बरोबर नेण्यासाठीं सीतामाईनं प्रभु रामचंद्राची, माझ्या इतकी मनधरणी खास केली नसेल. रामचंद्रांनीं आपल्याइतके आढेवेढे खास घेतले नसतील!

तुलसीदास—जानकीमाता प्रभु रामचंद्राची अर्धांगी होती-पण तूं माझी-

कलावती—अर्धांगी झालें आहे, याला प्रत्यंतर ही तसबीर आहे. मग झालेंना मी आपली अर्धांगी-सांगायचं गडे?

तुलसीदास—इतका वेळ मोठ्या प्रयासानं रक्षण केलेल्या माझ्या हृदय-दुर्गाचा अखेर तुझ्या वाक्पांडित्यानं पाडाव केला खरा! पण मी तुला सांगून ठेवतों कीं, माझ्यासारख्या बेजबाबदार कवीशीं सहाचार राखणं हें तुला सीता-मातेच्या वनवासापेक्षांही कठिण जाईल.

कलावती—अहाहा! नाथ! मी कृतार्थ झालें!

१७. पद

**पुण्यनाम वदनीं घेतां जनकनंदिनी। पावली। निर्मिली तिनें अनुकंपा कठिणशा मनीं। आपुल्या ॥ध्रु०॥ पुण्यचरित सीतासतिचें। आचरोनि अविरत साचें। जतन करिल संकल्पाचें, ही सुभागिनी। आपुली ॥ १॥**

मीही प्रतिज्ञा करतें कीं, आपलं महाकाव्य संपूर्ण होण्यापूर्वी आपलं चित्त व्यग्र होण्यासारखं कसलंही वर्तन माझ्याकडून होणार नाहीं; इतकेंच काय, पण माझ्या अस्तित्वाची जाणीवदेखील मी आपल्याला होऊं देणार नाहीं.

तुलसीदास—मी पुन्हा एकवार तुला सांगतों-कवीला संसारसुखाची कल्पना असते; पण त्याची त्याला किंमत नसते-गृहस्थाश्रमाची लौकिक जबाबदारीदेखील तो जुमानीत नाहीं. प्रेमाच्या अनुभवाशीं त्याला कांहीं कर्तव्य नसतं-प्रेमावर फक्त त्याला काव्य कर्तव्य असतं. तुझ्या प्रेमाचा मोबदला तुला मिळेल कीं नाहीं याची—

कलावती—नाथ, साध्वीच्या प्रेमांत मोबदल्याचा हिणकसपणा नसतो. मी आपल्या प्रेमाच्या अपेक्षेनं हें आत्मसमर्पण करीत नाहीं. माझं प्रेम ही केवळ माझी पूजासामग्री आहे. आपल्या चरणांवर ही प्रेमकुसुमाञ्जलि वाहिली आहे, तिचा आपण अव्हेर करूं नये, एवढीच माझी प्रार्थना आहे. प्रसादरूपानं त्यांतील एखादी पाकळी मला मिळाली तर माझं जीवित सफल झालं असं जग म्हणेल इतकंच. परंतु प्रसादाच्या आशेनं मी माझ्या देवाची पूजाअर्चा करीतच नाहीं.

१८. पद

**प्रेमकुसुमाञ्जली वाहिली। नाथपदिं। दासी पदां-पाशिं आशा त्यजुनि आली ॥ ध्रु० ॥ अनुराग कीं लाभ-वांछा मनीं ना। धिक्कार न कराचि समजोनि हीना। दासी उदासी मनीषा धरुनि आली ॥ १ ॥**

लौकिकमर्यादा झुगारून, कुलवान् कुमारिकेला अनुचित असं प्रेमाचं प्रदर्शन आपल्यापुढं मीं निर्लज्जपणानं मांडलं, म्हणून आपल्या मनांत माझ्याविषयीं तिरस्कार उत्पन्न झाला नसला म्हणजे झालं. मीं लौकिकमर्यादा सोडली याचं कारण आपण अलौकिक बिभूति आहांत, आणि अलौकिक वस्तु मिळविण्याकरितां अलौकिक मार्गानंच जावं लागतं.

तुलसीदास—तर मग अशा अलौकिक प्रेमाचा स्वीकार मीही अलौकिक मार्गानंच करितों—

१९. पद

**अष्टदिक्पाळ हे तारका अक्षता। उधळुनी देति जणुं परिणया मान्यता ॥ ध्रु०॥ जडशिलेवरि अचल, भूमि बहुलें रची। लग्नमंडप रुचिर बांधिती तरुलता ॥ १ ॥ मुदितमन-मित्र हा दावी मशाला। पश्चिमा पाठि उभि कुंकुमें चर्चिता ॥ २ ॥ दास तुलसी कवी, वरितसे ही कला। साधुनी शुभ घडी, शुभदिन मुहूर्ता ॥ ३ ॥**

मदनमोहन—( प्रवेश करून फुलें उधळतो व दोघांना हार देतो. कला तुलसीदासाच्या गळ्यांत हार घालते.) दोन सुंदर तेजस्वी जीवांना, माझ्या

चित्रकलेनं आज एकरूप केलं, माझ्या जीविताचं कार्य संपलं. शुभमंगल सावधान ! (तुलसीदास कलेच्या गळ्यांत माळ घालतो.)

दीनबंधु—(पडद्यांत) हां ! खबरदार ! तिच्या गळ्यांत माळ घालशील तर-

कलावती—अरे देवा, बाबा आले !

तुलसीदास—काय, तुझे बाबा आले ? फार उत्तम झालं ! आतां राजरोसपणें आपण पतिपत्नी म्हणून मिरवायला हरकत नाहीं.

दीनबंधु—(प्रवेश करून) तुलसीदास, ही काय बदमाषी आहे ? सम्राटाच्या खानगी अमात्यांचा उपमर्द केल्याबद्दल हद्दपार झालास आणि आतां माझ्या मुलीवर दरोडा घालूं पाहतोस ?

२०. पद

**दुष्ट दांभिका, बका ! शिवत नाहि भीती शंका। अपहार करिसि मम कन्येचा। नीच वंचका ॥ ध्रु०॥ वैर समर्थांसीं करिसी। देशोधडि लागलासी। पापराशि त्यांवरि रचिसी। हरुनि कन्यका ॥ मम ही ॥ हरुनि० ॥ १ ॥**

तुलसीदास—असला सौंदर्याचा निधि दृष्टीला पडल्यावर कोण दरोडेखोर होणार नाहीं ? ज्या लावण्यभांडारावर दरोडा घालण्याकरितां प्रत्यक्ष सम्राटानं जिथं खास प्रतिनिधि पाठविले, तिथं इतरांची वृत्ति दरोडेखोर कां नाहीं होणार ? पाणिग्रहणविधानं हें सद्गुणभांडार माझ्या हस्तगत झालं आहे; माझ्या धर्मपत्नीचा हात माझ्या हातांतून सोडविण्याची आतां प्रत्यक्ष सम्राटाची प्राज्ञा नाहीं.

दीनबंधु—सम्राटाच्या नांवाचा उच्चार करण्याची-फार काय त्यांच्या प्रतिनिधीच्या नांवाचा उच्चार करण्याचीही तुझी लायकी नाहीं. त्या थोर विभूति दूरच आहेत; पण मी या पोरीचा बाप जिवंत असतांना, तुझी ही बदमाषी चालू देईन असं तुला वाटतं ?

कलावती—बाबा, माझ्या पतींना असली घाणेरडी भाषा बोललेलं मला साफ खपायचं नाहीं. तुम्हांला काय बोलायचं असेल तें मला बोला. आपल्याला जबाब द्यायला मी खंबीर आहे. मीं आपण होऊन यांना माळ घातली.

दीनबंधु—बापाच्या इच्छेविरुद्ध पोरींनीं स्वयंवर करण्याचे दिवस पुराणांत राहिले.

कलावती—आणि मुलींच्या इच्छेविरुद्ध तिला मोगलांच्या जनानखान्यांत लोटण्याचे दिवस कुराणांत राहिले.

दीनबंधु—तुलसीदास, तिच्या गळ्यांतला हार काढून घे, नाहीं तर स्वतः-च्या गळ्यावर हा समशेरीचा वार घे.

तुलसीदास—प्रत्यक्ष प्रतिनिधींच्या धाकाला भीक न घालतां ज्यानं घेतलेलं आसन सोडलं नाहीं तो तरवारीच्या धाकानं, पाणिग्रहणाचा हार पत्नीच्या गळ्यांतून काढून घेईल असं आपल्याला वाटतं ?

दीनबंधु—कलेच्या पाणिग्रहणाऐवजीं या समशेरीचं पाणी मात्र तुला चाखावं लागेल, ध्यानांत ठेव. सम्राटाकडून आतांच मला पोषाखाचा आणि या समशेरीचा नजराणा आला आहे, आणि लौकरच मला राजबहादुर हा किताब मिळणार आहे. हार काढून घे नाहींपेक्षां सम्राटानं नजर केलेल्या या समशेरीला पहिल्यानं तुझाच खून चाखायला मिळेल.

तुलसीदास—जातिबंधूंच्या गळ्यावर वार करण्याकरितांच समशेरीचा नजराणा सम्राट् करीत असतो. निःशस्त्र जातभाईवर समशेर चालविण्याच्या आपल्या अलौकिक बहादुरीवर खूप होऊन, राजबहादुर हा किताब, अकबर सम्राट् आपल्याला बहाल करणार असेल. पण ध्यानांत ठेवा कीं, उदयीक सूर्योदयापूर्वीं माझ्या केसाला जर धक्का लागला तर आपल्याला फांसावर लटकावं लागेल.

दीनबंधु—हद्दपार गुन्हेगार-माझ्या मुलीला फुसलावून नेणारा दरोडे-खोर-या कायदेकानूच्या गोष्टी तूं मला सांगणार ? सम्राटाच्या भावी श्वशुरा-ला आणि लौकरच होणाऱ्या राजबहादुराला, दहा पांच खून सहज माफ असतात. सूर्यास्त आणि सूर्योदय या किरकोळ मर्यादा कायदेपंडितांनीं पाळाव्यात. आम्हा शाहीसरदारांना, सूर्योदय आणि सूर्यास्त यांचा भेदा-भेद माहीत नसतो. चल सोड तिला—

कलावती—बाबासाहेब, पोटच्या मुलीचं मांस देऊं करून मिळविलेल्या मानमतराबांची धुंदी आपल्या मस्तकांत चढली आहे; परंतु माझाही निर्धार ऐका—पतीच्या मागोमाग सती जाणाऱ्या या विधवेचं प्रेतसुद्धां बाद-शहाच्या हातीं लागणार नाहीं !

दीनबंधु—कोण कोणाचा पति आणि कोण कोणाची पत्नी ? चोरटं लग्न,

चोरटा पति आणि चोरटी पत्नी-त्याचप्रमाणें चोरटी विधवा ही कोणालाच मान्य नसते. प्रतिष्ठित समाज राजरोस विधवेवांचून कोणालाच कबूल करीत नाहीं. तूं स्वतःच्या मनांत विधवा म्हणून खुशाल मांडे खा; पण बादशहाच्या किंवा आम्हां दरबारी मंडळीच्या मतानं तूं अविवाहित कुमारीच ठरणार. तुलसीदास, सोड तिचा हात. नाहीं तर ही समशेर घुसलीच पहा तुझ्या शरीरांत.

कलावती—प्रथम माझ्या शरीरांत घुसून तिची धार बोथट झाल्यानंतर माझ्या पतीच्या शरीराला तिचा स्पर्श होईल.

मदनमोहन—( पुढें येऊन ) बाबासाहेब, दया करा-माझ्या ताईच्या सौभाग्यावर असा निष्ठुर प्रहार करूं नका. आपल्या समशेरीला रक्ताचीच तहान असेल, तर हा पहा, आपल्या अन्नावर पोसलेला पिंड तिला तृप्त करायला तयार आहे; चालवा आपली समशेर.

दीनबंधु—चल हो बाजूला, तुला ठार करायला बादशाही समशेर कशाला? तुला लाथेखाली तुडवून ठार करतों. तुझ्या कारवाईमुळेंच आजचा हा प्रसंग माझ्यावर ओढवला आहे. प्रथम या नीचाचा समाचार घेतों—कार्टे, हो बाजूला. नाहींतर तुझाही प्राण घ्यायला मी मागंपुढं पाहणार नाहीं.

कलावती—खुशाल माझा प्राण घ्या; पण माझ्या पतीला, या कविरत्नाला यत्किंचितही इजा करूं नका. या कलेच्या प्राणांचा बळी घेऊन या मूर्तिमंत काव्याला जिवंत ठेवा, एवढंच माझं मागणं आहे.

तुलसीदास—छेः छेः! कलेशिवाय काव्याला जीवित नाहीं. तूं मागें हो—मामासाहेब, चालवा आपली तरवार. ( पुढें होतो.)

दीनबंधु—बस्स झालं-अखेरचं उत्तर दे. मुकाट्यानं हिला माझ्या हवाली करणार कीं नाहीं?

तुलसीदास—कवि कलेला प्राणांतींही दूर करणार नाहीं.

कलावती—अहाहा! मी धन्य झालें, ( पुढें येऊन ) बाबा माझ्यावर, आधीं वार करा.

२१. पद

**धन्या जी नाथ मान्या। त्रिभुवनीं वितरित कीर्ति सुकन्या ॥ ध्रु०॥ हृदय-रुधिर अर्पी स्वयें, जी करोनी पतिसि अमर। जनहिता साधी साध्वी अनन्या ॥ १ ॥**

मदनमोहन—बाबासाहेब, असे निर्दय होऊं नका–माझा प्रथम बळी घ्या.

दीनबंधु—दूर हो कार्ट्या.

[ त्याला हातानें ढकलतो व तरवार उपसतो, त्या अवधींत मदनमोहन मागच्या बाजूनें दीनबंधूच्या कमरबंदांतील खंजीर उपसून घेतो व त्याच्या छातीवर रोंखतो.]

मदनमोहन—( खंजीर रोखून ) अन्नदात्यांवर शस्त्र उगारल्याबद्दल परमेश्वर मला क्षमा करो.

दीनबंधु—( नाइलाजानें ) तुलसीदास, तूं आधीं माझ्या दृष्टीसमोरून चालता हो.

तुलसीदास—तुमच्यासमोर, कलेसह हा पहा कवि चालला !

[ कलावतीस घेऊन जातो.

[ पडदा.]

## अंक पहिला समाप्त

# अंक दुसरा

## प्रवेश पहिला

स्थळ—राजपूर शहरांतील कवि भुजंगाचे घरापुढील अंगण.]

घटिशेखर—( प्रवेश करून ) पावलागणिक पळ काढतों आहें; चालून चालून पायांची चाळण केली, पण व्यर्थ! चाळणींत पाणी घालून जीव देण्याची वेळ आली आहे. पण चाळणींतल्या पाण्यानं घटिका भरणार कशी, आणि घटिका भरल्यावांचून जीव जाणार कसा? घटिकापात्र गहाण टाकून कालची दोन प्रहरची वेळ कशी तरी निभावली. घटिपात्र गेल्यामुळं आतां धंदाही राहिला नाहीं. आज दोन महिने होत आले, इतक्या अवधींत कोणाचीच कशी घटिका भरेना? आरोग्याच्या दृष्टीनं गेला फाल्गुन मास लोकांना लाभला खरा; पण त्यामुळं मला मात्र पोट रिकामं ठेवून नुसतीच हातातोंडाशीं गांठ घालावी लागली आहे. कुठं खून नाहीं, जाळपोळ नाहीं, मारामारी नाहीं, चोरी नाहीं—चोरीच काय पण कोणाचं चोरून वांकडं पाऊल पडलेलं देखलि आढळांत नाहीं; अलीकडे इथले सगळे लोक अजागळ झाले आहेत. खून, दरोडे, अत्त्याचार, व्यभिचार, दुसऱ्याचीं गृहछिद्रं, गुप्त गोष्टी इत्यादींवर पोसलेला हा माझा पिंड, या अकबराच्या रामराज्यांत प्रेतवत् पडणार खास! बाकी माझ्या पिंडाला इतक्यांतच कांहीं कावळा शिवणार नाहीं. लोकांच्या दुदवाचा डांगोरा पिटून माझं उखळ पांढरं करण्याची माझी वासना दिवसेंदिवस बळावत चालली आहे. पण इकडे दिवसेंदिवस गिऱ्हाइकीला क्षय होऊं लागला आहे, त्याला काय करावं? घटिकापात्र गेलं, काशाचं झांगट गेलं आणि आतां ही जेवणाची थाळी घेऊन वाजवीत फिरतों आहें. चारुदत्ताला सुळाकडं नेणाऱ्या दवंडीवाल्या मांगाच्या वंशजाप्रमाणं माझा वेष झाला आहे! तुलसीदासाच्या लग्नाची दवंडी दिली, त्यामुळं माझी सरकारांतील तैनात गेली. कां? तर म्हणे कलावतीच्या बापाची—दीनबंधूची बेअब्रू झाली! आतां लग्नांत बेअब्रू कसली? माझंच चुकलं!—त्यापेक्षां मुलीचं वांकडं पाऊल पडलं म्हणून डांगोरा पिटायला पाहिजे होता, म्हणजे दीनबंधु नरम आला असता. पण नव्हेच तें! हा तुलसी-

दासच पांढऱ्या पायाचा खरा–त्याच्या नांवामुळें माझी अशी दशा झाली. बरं, तसं म्हणावं तर नदीपलीकडे त्याचं बरतान उत्तम बसलं आहे. त्याच्या काव्यावर खुष होऊन त्याच्या भक्तांनीं त्याला सुरेख आश्रम बांधून दिला आहे आणि त्याचं रामायण ऐकायला तिन्ही त्रिकाळ स्त्री-पुरुषांच्या झुंडीच्या झुंडी जात आहेत. काय बेटा नशिबाचा शिकंदर आहे एहा! पण माझं नशीब जें एका ठिकाणीं खिळून बसलं आहे तें कांहीं जागचं हालत नाहीं. घटिका धावत आहेत, पळं पळत आहेत. आजपर्यंत स्वतःच्या हिमतीवर गांवांतील नाहीं नाहीं तीं त्रांगडीं काढून, कांहीं स्वतःच निर्माण करून, कोणाकडून तोंड उघडण्याकरितां तर कोणाकडून तोंड बंद करण्याकरितां, माझा हात चांगला ओला होत असे; पण अलीकडे पाहतों तों मला दोन हातांवर कोणी उभा करीत नाहीं. घटिपात्र गह्वाण टाकल्यामुळं जाणारा येणारा आतां पूर्वीप्रमाणं वेळ विचारण्याकरितां सुद्धां माझ्याजवळ येत नाहीं कीं स्वतःची कांहीं बातमी देत नाहीं. त्यांतून ज्याच्या जोरावर हा धंदा मीं उभारला तो माझा दोस्त कवि भुजंगही मला चुकवूं लागला आहे. आज कांहीही होवो, त्याची भेट घेतलीच पाहिजे तर माझी कांहीं धडगत आहे. (दरवाजा ठोठावतो.) अहो कवि भुजंग, अहो कवि काला नाग, अहो राजकवि–(कवि बाहेर येतो त्यास) नमस्कार! कविराज!—

भुजंग—शुभकार्याला घरांतून बाहेर पडलों, तों हें काय दुर्जनाचं दुर्दर्शन!

घटिशेखर—कविराज, मीं आपल्याला प्रथम वंदन केलं आहे, तेव्हां दुर्जन कोण हें आपणच ठरवा. माझी तैनात गेली म्हणून मी दुर्जन झालों होय? पण माणसानं आपलं पूर्ववृत्त विसरूं नये. माझ्या शिफारसीमुळंच आपल्याला राजकवीचीं वस्त्रं मिळालीं हें ध्यानांत असूं द्या.

भुजंग—तें जाऊं दे रे; पण तुझं म्हणणं काय आहे तें लौकर सांग. मला जरा महत्त्वाच्या कामाला जायचं आहे.

घटिशेखर—ठाऊक आहे तुमचं महत्त्वाचं काम. कुठली तरी आर्या आणि कांहींतरी छंद घेऊन बसलां असाल झालं!

भुजंग—आर्येचा छंद! तुला ही बातमी कोणीं सांगितली!

घटिशेखर—कसली बातमी?

भुजंग—कीं, मी आर्येच्या छंदांत आहे म्हणून.

घटिशेखर—(स्वगत) राजेश्री कांहींतरी फंदांत आहे! (प्रगट) अहो, मांजर डोळे मिटून दूध पितं–शिकार तर खूप शोधून काढलीत! (स्वगत) इथं कोणाला माहीत आहे, काय शिकार आहे ती!

भुजंग—शिकार! अरे याला म्हणावं काव्यप्रतिभा आणि कविप्रभाव! एकादी तरी रमणी काव्यप्रबंधांत बद्ध केली नाहीं तर तो कवि कसला? मी आतां कोण होणार आहें, कळलं का तुला? दीनबंधु पाठकाचा दिव्य जामात! कनकांगीचा काव्यकंद–सम्राटाची नजर असलेल्या कलावतीच्या सख्ख्या बहिणीचा भावी पति!–दिल्लीपतीचा जवळजवळ भावी साडूच म्हणेनास–आज-पासून माझ्याशीं अदबीनं बोलत जा; जास्त सलगी दाखवीत जाऊं नकोस, नाहींपेक्षां माझ्या प्रतिष्ठेला बट्टा लागायचा! मी राजपूरचा राजकवि आणि दिल्लीश्वराचा साडू!

घटिशेखर—तें सारं समजलं–पण काय हो कविराज, आपण हा लग्गा साधलांत कसा?

भुजंग—अरे बाबा, हा कविप्रभाव! कलावतीची बहीण कनकांगी म्हणजे सवाई कलावती आहे! कलावतीनं तुलसीदासासारख्या भुक्कड कवीला वरलं तेव्हां वडील बहिणीवर ताण करण्याकरितां कनकांगीनं मला–या राजपूरच्या राजकवीला पसंत केलं!

घटिशेखर—तें सारं खरं; पण तुलसीदासाला हद्दपारीची शिक्षा झाली आहे! त्यावर ताण करायची म्हणजे आपल्याला सुळावर किंवा फांसावर तरी चढलं पाहिजे, नाहींपेक्षां हद्दपारीवर ताण कशी होणार?

कनकांगी—( प्रवेश करून ) खरंच, प्राणनाथ, फांसावर लटकून तुलसी-दासाच्या हद्दपारीवर ताण केलीच पाहिजे. त्याशिवाय मी नाहीं ऐकायची.

भुजंग—हो का? पण फांसावर चढायचं म्हणजे प्राण द्यावा लागतो.

कनकांगी—मग, आपण मला कितीवेळ तरी सांगितलं आहे कीं, मी तुझ्याकरितां प्राणदेखील देईन म्हणून!

भुजंग—अग, प्रेमांत बोललेली आणि स्वप्नांत बरळलेली भाषा सारखीच असते. स्वप्नांतील भाषा खरी करून दाखवायला मी कांहीं हरिश्चंद्रासारखा मूर्ख नाहीं.

**कनकांगी**—तें कांहीं नाहीं, फांसावर लटकून तुलसीदासावर ताण केलीच पाहिजे. आज आपल्या परीक्षेची चांगली संधि आली आहे.

**भुजंग**—या तुलसीदासावर ताण म्हणजे प्राणसंकटच! बरं, तुझ्या हौसे-करितां मी फांसावर चढायला तयार झालों तरी प्रथम माझ्या हातून खून झाला पाहिजे. आणि तो कोणाचा करायचा?

**कनकांगी**—त्यांत काय कठीण आहे? आयता हा मेला दवंडीवाला बरा सांपडला आहे; फोडा याचा नगारा याच्याच डोक्यावर.

**घंटिशेखर**—जय भवानी! माझी घटका आतां मात्र खरीच भरली म्हणायची! बाईसाहेब, माझी मरायला तयारी आहे; पण माझा नगारा तूर्त मढवायला दिला आहे. आणि आपल्या या प्राणनाथांना फांसावर टांगल्या-नंतर आपण लग्न कोणाशीं करणार?

**कनकांगी**—कां बरं? कलाताई हद्दपार झालेल्या तुलसीदासाची बायको नाहीं का झाली? तशी मीही फांसावर लटकणाऱ्या राजकवीची अर्धांगी होईन. पण कलाताईचा माझ्यापुढं तोरा नको. जीवितेश्वरा, मी आपल्या प्रेता-बरोबर लग्न लावून, राजकवीची भाग्यशाली विधवा म्हणून मोठ्या तोऱ्यानें कलाताईपुढं मिरवीन!

**भुजंग**—स्त्रीसुख म्हणजे स्वर्गसुख म्हणतात, तें माझ्या बाबतींत अक्षरशः खरं होणारसं दिसतं.

**कनकांगी**—स्वतः मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाहींच मुळीं.

**भुजंग**—पण त्यापेक्षां, जिवंत राहून स्त्रीसुख घेणं मला अधिक स्वर्गीय वाटतं.

**कनकांगी**—आपण पुरुषासारखे पुरुष आणि त्यांतून हा मेला माणूस मरायला तयार असतांना, राजखुर्षाचा साधा खून करायचं जिवावर येतं?

**भुजंग**—खून करून जीवावर येण्यापेक्षां, खून करायचं जीवावर येणं जास्त बरं.

**कनकांगी**—मग काय इलाजच नाहीं. निदान हद्दपार तरी व्हायचंच गडे. मी नाहीं त्याशिवाय सोडायची!

**भुजंग**—म्हणजे हद्दपार झाल्यावर आपाआपच मला सोडशील होय?

**कनकांगी**—मी नाहीं का आपल्याबरोबर येणार? कलाताई नाहीं का तुलसीदासाबरोबर गेली! काल रात्रींच माझ्या मनांत हें आलं. तुलसीदास

कवि तर आपण राजकवि; कलाताई मोठी बहीण आणि तुलसीदास लहान कवि; मी लहान बहीण आणि आपण मोठे कवि! हीं दोन्हीं पारडीं सारखीं झालीं; म्हणून म्हणत होतें, कीं पासंगाच्या दगडाप्रमाणं आपण फांसावर लटकलां असतां म्हणजे आमचं पारडं त्या दोघांच्यापेक्षां जड झालं असतं. पण आतां निदान हद्दपार होऊन तरी त्यांच्या तोलाबरोबर तोल ठेवला पाहिजे ना?

घटिशेखर—अहाहा! काय हें पत्नीप्रेम!

कनकांगी—केव्हां ही गोष्ट आपल्याकडून कबूल करवून घेईन असं मला झालं होतं. मी रात्रींच येणार होतें; पण म्हटलं नको. केव्हां उजाडेल असं झालं होतं!

घटिशेखर—शिव, शिव! केवढा घात केलांत! रात्रींच आपण आलां असतां–निदान सूर्योदयापूर्वीं एक घटिका जरी आलां असतां तर मीं कशी सोन्यासारखी दवंडी पिटली असती! (स्वगत) आणि तुमच्या बापाकडून केवढी रक्कम उकळली असती. जाऊंदे झालं! स्वतःच्या नांवाचा डंका वाजवून घ्यायचं सर्वांच्याच कुठं नशिबीं असतं!

कनकांगी—मग ठरलं ना हद्दपारीचं? हद्दपारीचं ठरलं म्हणून दे दवंडी.

घटिशेखर—अहो कविराज–नव्हे राजकवि, हूं म्हणा, कीं देतों दवंडी!

भुजंग—अग, पण सम्राटांच्या अमात्यांचा अपमान केला म्हणून तुलसीदास हद्दपार झाला. पण मी कुणाचा अपमान करूं? या बडतर्फ झालेल्या दवंडीपिट्याचा उपमर्द करायचा कसा आणि तो व्हायचा कसा? याला लाथेखालीं तुडविला, चाबकानं झोडपला, याची कशीही पादपूजा केली, तरी पोटभर खाल्लेल्या माराचा डांगोरा हा स्वतःच तोंड वर करून गांवभर पिटणार–इतकी याची अब्रू! याचा कसा अपमान होणार?

घटिशेखर—कविराज, आतां मला दम निघेनासा झाला आहे. मला लाथेखालीं तुडवा, चाबकानं बडवा, पायांतले पैजार काढून उडवा; पण माझी बेअब्रू कराच–म्हणजे आपली योग्यता तुलसीदासाबरोबर होईल—

कनकांगी—माझी कलाताईबरोबर होईल—

घटिशेखर—आणि माझी अमात्यसाहेबांबरोबर होईल! दवंडी पिटण्यासाठीं माझं तोंड कसं शिवशिवूं लागलं आहे.

**भुजंग**—माझे हातही शिवशिवूं लागले आहेत. पण—

**कनकांगी**—आतां नशिबावर हवाला ठेवून प्रयत्न करून पहावाच. सुदैवानं याचा खून झाला तर चांगलंच झालं; निदान याचं तोंड तरी चांगलं रंगवावं.

**भुजंग**—छे: ! असल्या लतकोडग्यावर हात टाकून माझीच बदनामी होणार.

**घटिशेखर**—वाहवारे मर्द ! कवि म्हणजे भागुबाईसारखे मुळमुळू काव्य करीत रडायचे ! येवढं तोंड पुढं केलं आहे, आणि दोन श्रीमुखांत भडकवायचं होत नाहीं. नामर्द ! तर मग आतां माझं तोंड मीच रंगवून घेतों, आणि तुमच्या नांवानं दवंडी देतों. माझ्या दवंडीचं काव्य मीच तयार करतों—

**भुजंग**—काव्य करायची तुझी काय माय व्याली आहे ! काव्य करायचा अधिकार माझा आहे. तें तुझं काम नव्हे.

**घटिशेखर**—ऐकाच तर मग माझं दवंडीकाव्य—

**राजकवीच्या अंगणांत नवल वर्तलें। कवि भुजंग कनकांगी बहकले। कनकांगीनें मुख वर केलें। कविराजें चोरून चुंबिलें॥**

**भुजंग**—अरे चूप, मित्रा, हें भलतंच काय बरळतोस ! कोणीं ऐकलं तर लोक काय म्हणतील ?

**घटिशेखर**—वा ! लोकांनीं ऐकावं म्हणूनच दवंडी द्यायची असते !

**राजकवीची रेवडी ! दीनबंधूची छबकडी ! लज्जतदार गुलाबछडी !!**

**भुजंग**—अरे बाबा, तुला हात जोडतों माझे आई ! तुझं तोंड बंद करायला काय घेशील, सांग.

**घटिशेखर**—आतां कसे ताळ्यावर आलांत ! दुसरी दवंडी मिळेतोंपर्यंत हप्त्याला पांच आश्रफी—अकबर छाप नाणं मोजून घेईन.

**भुजंग**—( त्याला पैसे देतो.) आतां तोंड बंद कर ?

**घटिशेखर**—आणि बाईसाहेब आपली देणगी नाहीं आली.

**कनकांगी**—मेल्या, ही घे देणगी—( त्याची थाळी त्याच्या डोकीवर मारते.) मिळाली देणगी ?

**घटिशेखर**—ओय ! ओय ! ! ( जातांना ) आपण नाही तर आपल्या बापाकडून वसूल करतों. “ चौचाल पोरीचा चोरटा कारभार–भर रस्त्यावर चुंबनीय प्रकार ! ” [ ओरडत जातो.

**कनकांगी**—आतां हें चोरटं चुंबन गांवभर होणार आणि बाबांच्याही कानावर लगेच जाणार–हा काय बरं आपल्यावर विनाकारण आळ ! खरंच, नाथ, आपणच सांगा, आपल्या कुंवारपणाला न शोभसं माझ्याकडून कांहींतरी झालं आहे का ? निष्कारण लागलेला हा कलंक आपल्याला निमुटपणें पाहवतो ना ?

**भुजंग**—तर मग तो सकारण करून दाखवूं होय ?

**कनकांगी**—पुरुषांना अंतःकरण नाहीं म्हणतात तेंच खरं. मी मात्र कुंवारपणीं आपली विधवा व्हायला एका पायावर तयार आहें, आणि आपण एवढ्याशा मेल्या हद्दपारीलासुद्धां कबूल नसावं हें बरं का ?

**भुजंग**—तुझं हें अलौकिक पतिप्रेम पाहून माझी मलाच लाज वाटूं लागली आहे.–इतःपर आपला संबंध नको–झाली इतकी माझी शोभा पुरे झाली. तुझ्या बापाच्या कानावर ही दवंडी गेल्यावर त्याचे काय परिणाम होतील ते भोगायला मी तयार आहें.

**कनकांगी**—काय, हद्दपारीसुद्धां भोगायला तयार आहांत ? आतां मात्र आपण तुलसीदासाप्रमाणं शोभतां खरे ! हद्दपार झाल्यावर नदीपलीकडे आपणही तुलसी-दासासारखा आश्रम बांधूं. आपणही एक रामायण लिहायला सुरवात करावी. आणि कलाताईप्रमाणं मी आपली अर्धांगी आपल्या मागोमाग येईन.

**भुजंग**—अर्धांगाचं नांवसुद्धां काढूं नकोस. तुझ्या प्रेमाच्या झपाट्यानं माझं अर्धं अंग आधींच नाहींसं झालं आहे आणि उरलेलं अर्धं अंग तुझ्या तावडींत सांपडलं म्हणजे या राजकवीचा अवतारच संपुष्टांत येईल. तुला मी माझी पत्नी करून घेणं शक्यच नाहीं.

**दीनबंधु**—( प्रवेश करून ) पत्नी करून घेणं शक्य नाहीं ? नीचा, प्रथम तिला फुसलावून वांकड्या वाटेला नेलंस, आणि आतां लग्न करायचं नाकारतोस ? पण या गमजा माझ्यापुढं नाहीं चालायच्या. निमूटपणें इच्यांशीं लग्न करायला कबूल हो, नाहींपेक्षां सम्राटानं नजर केलेल्या या माझ्या समशेरीशीं गांठ आहे.

**भुजंग**—इच्याशीं लग्न करून चिरकाल यमयातना भोगण्यापेक्षां एकदांच मोक्ष मिळालेला बरा.

**दीनबंधु**—बऱ्या बोलानं जिवंतपणीं इच्याशीं लग्न नाहीं लावलंस तर तुझ्या प्रेताबरोबर इचं लग्न लावून माझ्या घराण्याची अब्रू मी साफ करून घेईन. माझ्या बेइज्जतीचा बभ्रा गांवभर झाला आहे.

**कनकांगी**—बाबा, कसं अगदीं माझ्या मनांतलं बोललात. मी यांना मघांपासून सारखी सांगते आहें, कीं काय वाटेल तें करा—जाव गहाण टाका—पण तुलसीदासावर ताण झालीच पाहिजे: कलाताइचा तोरा माझ्यापुढं नको !

**भुजंग**—ही बापलेकींची दुक्कल माझ्या जिवावरच उठलेली दिसते. मुलगी म्हणते मरण्याकरितां लग्न करा, आणि बाप म्हणतो लग्नाकरितां मरा ! या मगरमिठींतून सुटायला मार्गच नाहीं !

**दीनबंधु**—जलदी बोल, लग्न करतोस कीं मरतोस ?

**भुजंग**—दोन्हींचा अर्थ एकच ! प्रभो दीनबंधो ! मला जगूं द्या. मी लग्न करतों. पण एका अटीवर—ही माझ्या शब्दांत राहिली पाहिजे.

**दीनबंधु**—अहो, एकदां लग्नाला कबूल व्हा; मग बायको मुठींत कशी ठेवायची तें मी तुम्हांला शिकवीन !

**कनकांगी**—मी नाहीं असल्या मेषपात्राच्या मुठींत रहायची—म्हणे मला जगूं द्या ! हे हद्दपार झाले तरच मी यांच्या आज्ञेंत वागेन.

**दीनबंधु**—बाळ कनकांगी, यांच्याशीं तुझं एकदां लग्न झालं म्हणजे तुझ्या पतीला तूं तार, मार किंवा हद्दपार कर—या गोष्टी बायकांच्या हातांत असतात.

**भुजंग**—हे काव्यदेवि शारदे ! तूंच या भक्ताचं तारण कर.

**दीनबंधु**—आतां चार दिवसांनीं पहिल्याच मुहूर्तावर लग्न उरकायचं. जर मध्यंतरीं कुठं नापत्ता झालास तर माझ्या या समशेरीशीं प्रसंग आहे, ध्यानांत ठेव. चला, हें एक ठरलं—जांवईबोवा, आतां मला पुढच्या तयारीला जाऊं द्या—

**भुजंग**—लग्नाला मी कबूल आहें, पण मुहूर्त जरा पुढचा धरला तर—

**दीनबंधु**—एक शब्दही बोलूं देणार नाहीं—या लग्नाची घाई करण्याचं तसंच कारण आहे.—या लग्नसोहाळ्याच्या निमित्तानं कलावतीला इकडे आणायचा माझा बेत आहे. एकदां ती इकडे आली, कीं झालीच तिची रवानगी दिल्लीला ! चल ग ए पोरी, तुला आज एक महत्त्वाच्या कामगिरीवर पाठवितों. तुझी आई तर बिछान्याला खिळलेलीच आहे,—तेव्हां तुलाच गेलं पाहिजे तुझ्या ताईकडे—चल.

**कनकांगी**—बाबा, ही मी आलेंच—( दीनबंधु जातो. ) नाथ, नापत्ता व्हायचं

असेल तर नदीपलीकडे आपण होऊन हद्दपार व्हा, आणि मला गुप्त निरोप पाठवा, कीं पाठोपाठ मी आलेंच! राजकवीशीं लग्न करायचं तर अशा अलौकिक मार्गानं करण्यांत कांहीं मौज! या कामांत कलाताईला मी खालीं पहायला लावीन तर खरी! [ जाते.

भुजंग—हद्दपार झालों, इथें राहिलों अगर नदींत पडून मध्येंच बुडालों तरी इची मगरमिठी कांहीं सुटत नाहीं—मग उगीच जिवाची यातायात कशाला? प्रसंगाला तोंड दिल्यावांचून गत्यंतर नाहीं. [ जातो.

---

## प्रवेश दुसरा

[ स्थळ—नदीपलीकडील किनाऱ्यालगतचा तुलसीदासाचा आश्रम. तुलसी रामायण ऐकावयास येणाऱ्यांपैकीं दोन गृहस्थ प्रवेश करितात. ]

पहिला गृहस्थ—( दुसऱ्यास ) मग उद्यां येणार ना? आणखी दोन दिवस पाहूं!

दुसरा गृहस्थ—आज तीन महिने झाले, इतक्या दिवसांत मीं एकदांही खंड पडूं दिला नाहीं. बहुतेक रामायण ऐकलं, पण अलीकडे आठ-पंधरा दिवसांत राहिलेला अखेरचा कथाभाग महाराजांच्या हातून पुरा होत नाहीं, हें आहे तरी काय?

पहिला गृहस्थ—असं झालं आहे खरं. महाराजांच्या वृत्तींत कांहीं विलक्षण चलबिचल झालेली दिसते. हें काय गूढ आहे? अलीकडे शृंगारिक स्त्री-विषयक काव्याखेरीज दुसरं कांहींच आमच्या कानावरून जात नाहीं. सीताशुद्धीच्या ठिकाणीं रामायण थांबलं तें थांबलंच! याचा अर्थ काय?

दुसरा गृहस्थ—आणि रामनवमीला हें महाकाव्य पूर्ण करण्याचा महाराजांनीं केलेला संकल्प तडीला जाणार कसा? महाराजांची वृत्ति स्त्रीलंपट झाल्याचा मला तर संशय येतो. थांबा, या चित्रकारानांच विचारून पाहूं. अहो मदनमोहन, जरा इकडे येतां का कृपा करून?

मदनमोहन—काय म्हणणं आहे?

पहिला गृहस्थ—म्हणणं कांहीं नाहीं—म्हणजे—म्हणणं असं कीं—विचारूं? राग नाहीं ना येणार?

**मदनमोहन**—छेः छेः ! मुळींच नाहीं येणार. खुशाल वाटेल तें विचारा.

**पहिला गृहस्थ**—म्हणजे त्याचं असं.—हल्लींच्या प्रकारावरून रामायण रामनवमीला संपूर्ण तयार होईल का ?

**मदनमोहन**—( स्वगत ) लोकांच्या कुजबुजीला उघड तोंड फुटलें एकूण.

**दुसरा गृहस्थ**—मी म्हणतों महाकवींनीं प्रथम लग्नच करूं नये हें बरं—आणि केलं तर स्त्रीला जवळ बाळगूं नये. बायको जवळ असली कीं, काव्याचे हातपाय मोडलेच.

**पहिला गृहस्थ**—निदान लग्न झालं आहे ही गोष्ट अजिबात विसरून तरी जावं. तुम्हांला कसं काय वाटतं ?

**मदनमोहन**—मी कविही नाहीं अन् माझं लग्नही झालेलं नाहीं; तेव्हां तुमच्या प्रश्नाचं मला उत्तर देतां येणार नाहीं. तें असो. पण तुमचा भावार्थ मला कळला.

**दुसरा गृहस्थ**—तें खरं, पण हा दिव्य ग्रंथ अशा रीतीनं वेळेवर पुरा कसा होणार ? असलं हें अलौकिक काव्य या यावनी—युगांत निर्माण झालं आणि तेंही जर अपुरं राहिलं तर मानवी जीविताच्या आनंदाचा एक निर्मळ जिवंत झरा मध्येंच एकदम आटल्यासारखा नाहीं का होणार ? आपण नेहमीं कविराजांजवळ असतां,—तेव्हां शृंगारापासून त्यांचं मन परावृत्त करण्याचा आपण प्रयत्न करून पहा.

**मदनमोहन**—कवींच्या स्वैरवृत्तीला इच्छित वळण देण्याचें कठीण कार्य, आजपर्यंत कोण करूं शकलें आहे ? तुलसीदासांच्या चरणाचा मी एक क्षुद्र सेवक आहे; तथापि आपल्या सर्वांच्या उत्कट इच्छेच्या आधारावर मी प्रयत्न करून पाहतों.

**पहिला गृहस्थ**—प्रभु रामचंद्र आपल्या प्रयत्नाला यश देवो. प्रयत्नासारखं पुण्य नाहीं. हें महाकाव्य संपूर्ण झाल्यास, कोट्यावधि भक्तजनांच्या मोक्षमार्गावर दिव्य नंदादीप प्रज्वलित ठेवल्याचं पुण्य आपल्याला लाभेल. जरूर प्रयत्न करा.

[ जातात.

**मदनमोहन**—हें पुण्य कोणाच्या वांट्याला जाणार आहे कळत नाहीं. हा विषय महाराजांच्या पुढं काढायचा तरी कोणत्या तोंडानं ? अलीकडे महाराजांचं मन माझ्या कलाताईकडे ओढ घेऊं लागलं आहे हें उघड दिसतं. रामायण महाकाव्य रचण्यांत सर्व काळ तल्लीन होऊन राहिल्यामुळं इतर कोणत्याही विषयाकडे त्यांचा नजर चुकून देखील वळली नव्हती आणि त्यावरून माझ्या कलाताईचं आयुष्य प्रेमशून्य होणार अशी इतके दिवस मला भीति वाटत होती, ती नुक्तीच कुठं

मावळूं लागली आहे. आणि याच वेळीं त्यांच्या प्रेमोन्मुख वृत्तीचा ओघ वळविण्याचा मीं प्रयत्न करणं म्हणजे माझ्या कलाताईच्या सुखावर आपण होऊन अग्नि ठेवण्यासारखं आहे. महाकवीची स्वैरवृत्ति एकदां हट्टानं उलटली म्हणजे प्रपंचाकडे पुन्हा वळेलच असा कोणीं भरंवसा द्यावा ? पण छेः ! माझ्या कलाताईचं सुख—एका स्त्रीचं सुख हें कांहीं तुलसीदासासारख्या महात्म्याच्या जीविताचं ध्येयसर्वस्व नव्हे. असंख्य लोकांना चिरकाल आनंद देणाऱ्या तुलसी रामायणापुढें, तुलसीपत्नीचा पाड काय ? शिवाय, माझी कलाताई देखील, पतीची कीर्ति अमर व्हावी म्हणून स्वतःच्या सुखाचा काय, पण स्वतःच्या देहाचाही आनंदानं बळी देईल. हे महाराज आलेच; कांहींही होवो, जिवाचा धडा करून विषय काढावाच. [ बाजूला उभा राहतो.

तुलसीदास—( शृंगारिक पद गात येतात. )

२२. पद

**करिं कंकण कटिं किंकिणि वाजे। रुमझूमति नूपुर चरणीं। पीन पयोधर नील कंचुली। कांति दिपवि सौदामिनी ॥ ध्रु० ॥ कुटिल कुरल कुंतल, कंजनयन। मंदहास्य चंद्राननीं। कलकंठी कामकला कामिनी। गुंगवी गिरा गुणगानीं ॥ १ ॥**

( **मदनमोहनास** ) या पद्यांतील कल्पना किती बहारीची आहे पाहा. आणि तूं हें कवन अशा शुष्क वृत्तीनं आणि रूक्ष चेहऱ्यानं मात्र ऐकतो आहेस. आश्चर्य आहे ! अलीकडे मी पाहतों, इतके लोक रामायण ऐकायला येतात, पण त्यांच्या मुखावर पूर्वीप्रमाणं प्रसन्नता दिसून येत नाहीं. वानरसेना आणि राक्षससैन्य यांमधील युद्धकथा या लोकांना रम्य वाटतात; परंतु सुंदर कल्पनेचं आणि काव्यालंकाराचं मी प्रत्यहीं छत पसरीत असतां, श्रोत्यांपैकीं कोणाचंच समाधान होऊं नये हा चमत्कार नव्हे का ? सारांश काय कीं खरा रसिक दुर्मिळ.

**मदनमोहन**——महाराज, बोलण्याची क्षमा असावी. आपल्या अलीकडील काव्यामुळं आपल्या कीर्तीला कमीपणा येत आहे असं लोकांच्या नाराज भाषेवरून दिसून येत आहे.

२३. पद

**क्षमा करा महाराज या जनां। अधिक वचन नच उचितं परिजनां। बोल बोबडे म्हणुनि तयांतें नच अवमाना। हीच याचना॥ ध्रु०॥ रामचरित-मानस-सर-हंसा। हीन विषय-कूपांतरीं कसा। रुचत विहार? देति जन दोषा। कीर्ति नाश करि ही कुवासना॥ १॥**

कुठं तो रामायणरूपी भक्तिमार्ग-प्रदीप, आणि कुठं हे शृंगारज्योतीचं कज्जल!

**तुलसीदास**—अरे, दीपापासून कज्जल निर्माण होणारच, यांत माझा काय दोष! शृंगाराला तूं कज्जल म्हणतोस; परंतु कज्जलाची काळी रेख, सुंदरीच्या शुभ्रभाल-पटलावर कुटिल केशराजींतील शुभ्र भांगाइतकीच शोभा देते! आणि तसं पाहिलं तर स्त्रीच्या ठिकाणीं कोणती शोभा दृष्टीला पडत नाहीं? सर्व कलावंतांचा आद्य-गुरु जो विश्वकर्मा त्यानं तरी स्त्रीप्रतिमा निर्माण करतांना काय केलं? नेत्रांना अत्यंत आल्हाद देणारं चंद्रबिंबाचं सौंदर्य स्त्रीमुखाच्या ठायीं ओतलं; कोमल पल्लवाचं हृदयंगम स्पर्शसौख्य स्त्रीच्या प्रत्येक अवयवावर माखलं, आणि कर्ण-मनोहर कोकिलेचं विश्वसंगीत तिच्या कंठाच्या ठिकाणीं स्थापिलं. त्याचप्रमाणें सौदा-मिनीचं चंचल तेज व मन्मथाचं अचुक शरसंधान तिच्या नेत्राचे ठिकाणीं निगडित केलं, आणि सृष्टीचं गोड रहस्य व पृथ्वीचा प्रशस्तपणा तिच्या हृत्प्रांतांत सांठवून ठेवला. स्त्रीनेत्रांतील विलोलविभ्रम तिच्या भ्रुकुटीतांडवांतील संभ्रम, तिच्या आविर्भावांतील मादक लालित्य आणि तिच्या एकंदर आकारांतील गूढ संगीत इत्यादि सर्व सामग्री, निसर्गांतील वस्तुमात्रापासून निवडून घेऊन ती ब्रह्मदेवानं एकत्र केली आणि पहातो तों ती सुंदर स्त्रीच्या रूपानें दृष्टिगोचर झाली! स्त्रीप्रतिमा म्हणजे विधात्याच्या नकळत कौशल्याची सीमा! अशा शृंगारदेवतेवर काव्य करणं म्हणजे विश्वांतील यच्चयावत् सौंदर्यावरच काव्य करणं नव्हे का? स्त्रीविषयक काव्य आणि शृंगारविषयक भावना यांवांचून सृष्टींत दुसरं सौंदर्यच नाहीं.

**मदनमोहन**—महाराज! असल्या या शृंगारलहरीपासून सात्त्विक भावना जागृत होत नसतात. आपल्यासारख्या सत्कवीपासून सद्भावनांचा विकास व्हावा अशी जगाला अपेक्षा असते.

**तुलसीदास**—प्रथम एकाद्या सुंदर रमणीवर प्रेम करायला शीक; निदान तिच्या सहवासांत कांहीं दिवस कामुकवृत्तीनं रहा आणि नंतर तुझं ब्रह्मज्ञान सांगायला

ये. मग तूं स्वतःच चित्रकाराचा शृंगारिक कवि होतोस कीं नाहीं तें पाहूं ! हें पहा माझें चालतें बोलतें काव्यच इकडे येत आहे ! ती दूर आहे तोंपर्यंत तूंही दूर जा, आणि मीही जरा दूर जातों म्हणजे माझ्या काव्यप्रतिभेला अधिक स्फुरण चढेल—

**मदनमोहन**—दूर काय म्हणून ? हें गूढ काय आहे तें कळलं नाहीं—

**तुलसीदास**—कविहृदयाची तुला कशी कल्पना येणार ? इच्छित वस्तु जितकी जास्त दूर तितकी काव्यप्रतिभा अधिक उत्कट होते; प्रिय वस्तूमधील स्थल-कालाचं अंतर हें कविप्रतिभेचं क्रीडांगण आहे; तें जितकं विस्तृत असेल तितकं उत्तम. प्रिय वस्तु निकट आली म्हणजे काव्याचं कार्य संपून कवितादेवीची क्रीडा तिथेंच थांबते. दूरांतरावरील वस्तूकरितां हृदय फोडून निघणारा कवीचा आर्तरव म्हणजेच काव्य.

**मदनमोहन**—आज आपल्या इथं काव्य पाणी भरतं आहे खरं !

**तुलसीदास**—सुंदर स्त्रीच्या पाणी भरण्यांत काव्य असतं असं म्हण.

**मदनमोहन**—आपल्या काव्याच्या प्रवाहांत, पाणी भरण्याचं माझं नित्य कर्तव्य मात्र राहिलं आणि त्यामुळें माझ्या कलाताईवर नाहीं त्या कामाचा भार पडला. मी तिच्या मदतीला जातों.

**तुलसीदास**—छेः छेः ! तिकडे जाऊं नकोस, माझं सर्व काव्य नाहींसं करशील. तूं दुसऱ्या कामाला जा. उद्यांपर्यंत इकडे येऊंसुद्धां नकोस. पार नदीपलीकडे नाहींसा हो. मीही जरा आतां दूर जातों— [ जातो.

**मदनमोहन**—(स्वगत) काय ही या महात्म्याची अधोगति ! [ जातो.

[ **कलावती** घागर घेऊन प्रवेश करिते. ]

**कलावती**—(स्वगत) शरीराला कष्टांची संवय नसणं, यासारखी दुसरी दुर्दशा नाहीं. दुबळं शरीर म्हणजे मूर्तिमंत दुर्दैव. ही एवढीशी भरलेली घागर ती काय, आणि ती आश्रमापर्यंत न्यायला मला तीन ठिकाणीं विसावा घ्यावा लागतो तो काय ! शरीराच्या फाजील लाडांचा परिणाम प्रपंचांत पदोपदीं नडतो पण हे सर्व कष्ट मला सोसलेच पाहिजेत. न सोसून सांगणार कोणाला ? महाराजांचं लक्ष माझ्या कष्टांकडे वेधणं अशक्य आहे. आणि मीं मुद्दाम तसा प्रयत्न करणं, म्हणजे नाथाच्या व्यवसायांत व्यग्रता उत्पन्न करून, आर्यपत्नीच्या सोशिक स्वभावधर्माला बट्टा लावल्यासारखं नाहीं का होणार ! पतीच्या अंगीकृत कार्यांत पूर्णपणें विलीन

होऊन, स्वतःच्या अस्तित्वाची जाणीवदेखील त्यांना न होऊं देणं हेंच आर्य-पत्नीचं ब्रीद आहे. छेः! पण माझ्या कष्टाची जाणीव अलीकडे मधून मधून 'तरी मला कां होऊं लागली आहे बरं—

२४. पद

**सेवारत काया आजि होई विगलीत अशी कां ? ॥ ध्रु० ॥**
**रामकथामृत नाथमुखींचें । क्लेश लेश नुरवी मम तनुचे ॥**
**सांप्रत रामा परि त्यांसि रुचे । तापदायी मनिं येति कुशंका ॥१॥**

नाथांनीं संकल्प केल्याप्रमाणं रामजन्माच्या पुण्य घटकेला रामायण संपूर्ण झालंच पाहिजे. मी जवळ असल्यानं कदाचित् त्यांचं चित्त चळण्याचा संभव आहे म्हणून मी मुद्दाम त्यांच्यापासून दूर दूर असतें. आणि मी हें कठोर व्रत आचरीत असतांना, नाथांच्या निर्मळ प्रतिभेला विषयकर्दमानं गढूळ करणारी कोण अभागी स्त्री त्यांच्या मनांत भरली आहे कळत नाहीं. पण ही काय भलतीच कल्पना! महाराजांच्या-विषयीं असली शंका !—पण पापशंकेवांचून प्रेम नाहीं हेंही खरें. मी तरी काय करूं? हें माझं पतिप्रेमच माझ्या मनांत असल्या कल्पना उभ्या करतें. चला, असल्या विचारांनीं चित्ताची विनाकारण चलविचल मात्र होते.

२५. पद

**शंकितां वृथा नाथां । मानसा व्यापि चिंता ॥ध्रु०॥ शिण-वुनी स्वयें काया । करित जी पुण्यसंचया । पतिसि देई शुचिता कान्ता ॥ १ ॥**

नकोच तो विचार. पतीचं पावित्र्य म्हणजे पत्नीचा पुण्यसंचय; माझा पुण्यसंचय भरपूर नसेल तर त्यांत भर टाकण्याचा मला प्रयत्न केलाच पाहिजे. ( घागर उचलून कडेवर घेते व जाऊं लागते. )

तुलसीदास—( प्रवेश करून ) थांब, कांहीं वेळ अशीच उभी रहा, आणि माझ्या काव्याचा आदर्श हो! ( कलावती घागर ठेवूं लागते. ) छेः छेः! घागर खालीं ठेवूं नकोस. तुझ्या कृश कटीवर विराजमान झालेला व गोंडस बाहूंनीं वेष्टिलेला हा भाग्यशाली घट, चंद्रबिंबाला बिलगणाऱ्या विद्युन्मेघाप्रमाणं भासतो आहे; आणि हा मेघ ती नाजूक चंद्रकोर भंगून टाकील कीं काय या भीतीनं, या विशाखाच्या दोन तारका—हे तुझे नेत्र—कंप पावत आहेत असा भास होतो. कांहीं वेळ अशीच उभी रहा. हें दिव्य दृश्य पाहून माझ्या काव्यसागराला भरती येत आहे.

**कलावती**—असा भलताच हट्ट काय बरं ? माझी कंबर खरंच मोडायच्या बेताला आली आहे.

**तुलसीदास**—होय ? मग हा तर तुझ्या सूक्ष्म कटीचा गौरवच आहे.

**कलावती**—हें काय बरं असं ? हा भार आतां सोसेनासा झाला—

**तुलसीदास**—पयोधराचा भार न सोसणाऱ्या तरुणी हृदयशून्य म्हटल्या पाहिजेत!

**कलावती**—पुरं झालं; संस्कृताच्या पदराखालीं कांहीं बोललं तरी शोभतं म्हणायचं ? मी येथून जातेंच कशी; म्हणजे आपल्या या असल्या काव्याला भरती यायला नको ! ( जाऊं लागते.)

**तुलसीदास**—भार सोसत नाहीं म्हणून म्हणायचं मात्र तोंडानें; पण तोच भार कटिप्रदेशावर धारण करून दिमाखानं मत्तगजाप्रमाणं मिरवीत जाण्यांत स्त्रियांना धन्यता वाटते नाहीं ?

**कलावती**—आज आपल्याला झालं आहे तरी काय ? आपण गेल्यावांचून मी येथून हालणारच नाहीं. ( घागर खालीं ठेवते.)

**तुलसीदास**—अहाहा ! घागर खालीं ठेवतांना तूं आपले ओंठ घट्ट मिटून घेतलेस; जणुं काय घटांतील प्रतिबिंब तुझ्या बिंबोष्ठाचें चुंबन घेईल या भीतीनेंच ते मिटलेस असं वाटतं ! तूं आपले ओंठ मिटून घेतलेस परंतु तुझे नेत्र तुझ्या अंतर्यामींचा भाव स्पष्ट करीत आहेत.

२६. पद

**सुरस-सुर-सुधा रांधियली, जणुं कनकपात्रीं । वच तेवि मोही, सुगात्री ! । ध्रु०॥ मधु अधर-संपुटीं । कृपणसम, कृशकटी !। सांठविसि मजसाठीं। स्पष्ट हा भाव तव नेत्रीं॥१॥**

**कलावती**—आतां मात्र शर्थ झाली बाई ! महाराज, आपली वृत्ति आज इतकी विलासी, इतकी रंगेल कशानं झाली ?

२७. पद

**या शृंगार-लहरी । तांडव करिती परोपरी प्रशांत-मानस-सरोवरीं ॥ ध्रु०॥ मदनवातें कशा भ्रमति, नाचती, करिति नादा । भय निपजविती मदंतरीं ॥ १ ॥**

**तुलसीदास**—तुझ्यासारख्या रमणीच्या सहवासांत कोणाची वृत्ति विलासी होणार नाहीं ?

कलावती—जसं कांहीं कोणी खरंच म्हणेल ? इतके दिवस माझा सहवास नव्हता वाटतं ? कधीं चुकून तरी असली नजर माझ्याकडे वळली होती का ? तें कांहीं नाहीं, रामायण रचण्यांत गुंग झालेल्या आपल्या निर्मल प्रतिभेला भुलवून भलत्याच दिशेला नेणारी कोणी तरी दुसरीच रमणी आहे खास ! ती कोण आहे तें मला समजल्याशिवाय मी आपल्याला इथून सोडायचीच नाहीं.

तुलसीदास—त्या घागरींत न्याहाळून पहा म्हणजे समजेल, कोण आहे ती !

कलावती—त्यांतलं पाणी हलतं आहे—त्यांत कांहीं दिसणार नाहीं.

तुलसीदास—तर मग माझ्या नेत्रांत पहा. नेत्र हे हृदयाचे गवाक्ष आहेत असें मोठमोठया कवींनीं म्हटलें आहे आणि त्यांत दिसणारी मूर्तीच हृदयांत नाचत असते.

कलावती—आपण बोलण्यांत कुणाला हार जाणार ! पण असल्या गोड गोड भाषेनं मी नाहीं फसणार. मी जर खरोखरीच आपल्या डोळ्यांत नाचणारी बाहुली पाहूं लागलें, तर आपले डोळे चळतील, आणि आपल्या हृदयांतील रहस्य खात्रीनं बाहेर पडेल.

तुलसीदास—खुशाल बाहेर पडूं दे-आपली त्याला तयारी आहे.

कलातती—पहायचं बरं-भलतीच बाहुली दिसली म्हणजे नाहीं होय करायचं होईल-पाहूं मी ? डोळे अगदीं मिटायचे नाहींत.

तुलसीदास—ठीक आहे. ( ती दोन्ही हात त्याचे खांद्यावर ठेवून पाहूं लागते. तुलसीदास डोळे मिटून घेतो.)

कलावती—हें काय, आम्ही नाहीं-डोळे मिटायचे नाहींत-कशी चोरी पकडली !

तुलसीदास—( तिला जवळ घेऊन ) ही पहा माझ्या डोळ्यांतली बाहुली घनरूप होऊन माझ्या बाहुपाशांत सांपडली ! वेडी कुठची ! अशी सौंदर्याची व सद्गुणांची मूर्तिमंत सरिता माझ्या सभोंवतीं निरंतर वहात असतांना, माझी काव्यप्रतिभा त्यांतील भोंवऱ्यांत सांपडून घिरट्या घालीत राहिली तर नवल काय ! या क्षणीं तर माझं काव्य या प्रेमप्रवाहांत सर्वस्वीं निमग्न होऊन गेलं आहे ! माझं काव्य संपलं-प्रेमाची वस्तु हस्तगत झाल्यावर काव्याचं प्रयोजनच रहात नाहीं. खरंच, तुझ्या या गोंडस हाताचं मार्दव माझ्यापूर्वी या नीरस घटाला अनुभवायला मिळालं याबद्दल मला त्याचा हेवा वाटतो. अतःपर तुझ्या नाजुक हाताचा त्याला

स्पर्श होतांच कामा नये. मीच त्याचा कान धकडून त्याला आश्रमांत कोंडून ठेवतों. ( घागर उचलूं लागतो.)

**कलावती**—( त्याला अडवून ) असलं भलतंच कांहीं करायचं नाहीं. घागरीला हात लावायचा नाहीं, सांगतें–कोणीं पाहिलं तर काय म्हणतील ?

**तुलसीदास**—हा संस्कृतावर सूड उगवलास वाटतं ? तें असो; पण तुझ्या नाजूक शरीराला श्रम झालेले मला पाहवतील कसे ?

**कलावती**—त्यांत काय कठिण आहे–काव्य करायला लागावं म्हणजे झालं. आतांच नाहीं का, भरलेली घागर घेऊन मला किती वेळ तरी तिष्ठत ठेवायचं झालं ! त्या वेळीं कुठं माझी कळकळ केली नाहीं ? आणि आतांच एवढा मायेचा उमाळा कोठून आला तो ?

**तुलसीदास**—हें पहा, आम्ही कवि एखाद्या वस्तूवर प्रथम काव्य करतों, नंतर त्या वस्तूची कींव करतों आणि अखेर तिची किंमत करतों. तूं स्वतःवरूनच पहा–प्रथम तुझ्यावर मीं काव्य केलं, नंतर तुझ्या कष्टांची कींव केली, आणि शेवटीं आतां तर तुला हृदयांत सांठवून ठेवूं कीं गंगेप्रमाणं मस्तकावर धारण करूं इतकी मला तुझी किंमत वाटूं लागली आहे.

**कलावती**—पुरे झालं, बायकोला मस्तकावर बसविली म्हणजे हातीं घेतलेलं काव्य जिथल्या तिथें कायमचं थांबेल. आपला रामायण पुरं करण्याचा संकल्प इथंच संपला म्हणायचा; पण मला हा असा गौरव नकोच आहे. मी आपल्या चरणाची केवळ दासी आहे; हींच माझी पायरी–आणि हेंच माझं भूषण.

**तुलसीदास**—दासी–याचा अर्थ पतिहृदयावर राज्य करणारी सम्राज्ञी, असंच ना ? बाकी दास्य पतकरून स्वराज्य मिळविण्याची विरोधी विद्या बायकांनाच साधते. स्त्रीजात विश्वविजयी झाली आहे याचं कारण हे विरोधी गुणांचं विचित्र अस्त्र विधात्यानं फक्त स्त्रियांच्याच हातीं दिलं आहे, हें होय.

**कलावती**—कसल्याही गोष्टीला विरोध करण्याचा हक्क बिचाऱ्या स्त्रीजातीला देवानें दिला आहे कुठं ? आणि पुरुषांनीं जुमानला आहे कधीं ?

**तुलसीदास**—मुद्दाम असं वेड पांघरूं नकोस. स्त्रीच्या प्रत्येक कृतींत, प्रत्येक शब्दांत, प्रत्येक आविर्भावांत, नखशिखांत विरोधी भावना भरलेली असते. पहा, स्त्रीच्या नकारांत संमतीचा स्पष्ट ध्वनि ऐकूं येतो; तिच्या चंचल नेत्रांत मन्मथाचं अचुक शरसंधान आढळून येतें; तिच्या अस्फुट लाडक्या बोलांत ज्ञानवंताचं

पांडित्य, लज्जाविनय चेष्टेंत प्रतिपक्षाच्या धारिष्टाला आव्हान आणि तिच्या स्मित-हास्यांत मन्मथाचा दारुण दिग्विजय हीं ओतप्रोत भरलेलीं दिसतात. यापलीकडे परस्परविरुद्ध गुणांचा समुदाय इतर कोठें सांपडणार ?

कलावती—म्हणजे ? घागरीला हात लावायचा नाहीं म्हणून मीं म्हटलें त्याचा अर्थ आपण पाणी भरावें असा नाहींना केला ?

तुलसीदास—आपला अर्थ छपवून ठेवण्याइतकी तूं चतुर आहेस. तुम्ही स्त्रिया, योग्य सावज पाहूनच आपलं शरसंधान योजितां; आणि या योजनेच्या चातुर्यामुळंच तुला प्रेमाचा विजयध्वज रोंवितां आला आहे. पतीच्या हृदयांत अतृप्त वल्लभाची तृष्णा सतत जागृत ठेवणं हेंच पत्नीच्या चिरकाल विजयाचं रहस्य आहे. आणि हें रहस्य तुझ्या हस्तगत झालं आहे म्हणूनच मी असा उन्मत्त व अतृप्त वल्लभाप्रमाणं तुझ्या भोंवतीं घिरट्या घालीत आहें.

कलावती—नाथ, आपल्यासारख्या काव्यमय वल्लभाची रमणी होण्याच भाग्य मला लाभलें हें माझ्या चातुर्याचं यश नव्हे. आपल्या अलौकिक वाणींतून निघणाऱ्या रामनामसंकीर्तनाच्या संततश्रवणाचं हें पुण्यफळ आहे; परंतु, पतिप्रेमा-च्या आस्वादाचा उन्माद एकीकडे मला झुलवीत आहे, तर दुसरीकडे, विषय-वासनेला उत्तेजित करून पतीचा कृतसंकल्प, नष्ट करण्याच्या पातकाची भीति मला भेवडावीत आहे. या दोन विरुद्ध दिशांनीं वाहणाऱ्या प्रवाहांमध्यें माझ्या अंतः-करणाची नौका हेलकावे खात आहे.

तुलसीदास—तूं कांहीं काळजी करूं नकोस. तुझ्या हृदयनौकेचा कर्णधार मी आहे; पण ही पहा, दुसरीच नौका नदीतटाला लागली ! या भलत्याच वेळीं इकडे कोण येत आहे, कळत नाहीं. कोणी तरी स्त्री दिसते आहे. कोण बरं असावी ?

कलावती—कोण बरें ? कशी चोरी बाहेर पडली ? आतां मी येथून हालणारच नाहीं. ( पाहून ) अगबाई, ही आमची कनकांगी—माझी बहीण !

तुलसीदास—काय तुझी बहीण ही ? पण ही इकडे कशी आली ? तुझ्या पित्यानं तिला परवानगी कशी दिली ?

कलावती—काय आहे कळत नाहीं—माझं काळीज कसं धडधडूं लागलं आहे.

कनकांगी—( प्रवेश करून ) ताई—

कलावती—किती दिवसांनीं मला भेटलीस ? (दोघी भेटतात.) तूं आज इकडे कशी आलीस ? आई, बाबा खुशाल आहेत ना ?

**कनकांगी**—ताई, काय सांगूं तुला, आईचा जीव किनई अगदीं घोटाळला आहे. आजची रात्र जाईल कीं नाहीं देव जाणे. (रडूं लागते.)

**कलावती**—काय सांगतेस तूं हें ? आईचं जास्त झाल्याची खबरदेखील आजपर्यंत माझ्या कानावर कुणींच घातली नाहीं कशी ?

**कनकांगी**—( स्वगत ) आई एकाएकीं आटपली म्हणून सांगितलं असतं तरी बरं झालं असतं. ( प्रकट ) हें बघ, तूं गेल्यापासून कीं नाहीं बाबा घराबाहेर पडतच नाहींत.

**कलावती**—अग, पण मला आधीं आईची हकीगत सांग.

**कनकांगी**—होय, पण तेंच सांगतेंना-बाबा कांहीं घराबाहेर पडत नाहींत. तूं अशी निष्ठुर-माझ्या लग्नाच्या वेळीं अक्षता टाकायलासुद्धां आली नाहींस.

**कलावती**—पण आईला काय होतं आहे तें सांगना आधीं—

**कनकांगी**—तेव्हांपासूनच आईनं अगदीं अंथरूण धरलं आहे. आज तर ती कसंसंच करते आहे. फक्त तुझ्यासाठीं तिचा जीव घोटाळला आहे. आतांच्या आतां आलीस तर तिची भेट होईल. आई तुझी सारखी आठवण काढते आहे— ती आज शुद्धींतच नाहीं.

**कलावती**—शुद्धींत नाहीं काय आणि आठवण काढते काय ! तूं काय सांगतेस तेंच कळत नाहीं.

**कनकांगी**—मला नाहीं बाई कांहीं सुचत. मधून मधून शुद्धीवर आली म्हणजे तुझ्या नांवानं हाका मारते.

**तुलसीदास**—(स्वगत) सौख्यपर्वताच्या शिखरासभोंवतीं, निराशेच्या कड्यांचीच पंक्ति पसरलेली असते. [ घागर घेऊन जातो.

**कनकांगी**—मग चलतेस ना ? विचारांत कसल्या पडलीस ?

**कलावती**—कांहीं नाहीं, तिकडचा निरोप घेऊन येतें.

**कनकांगी**—( स्वगत ) अखेरचाच निरोप घे आतां.

**कलावती**—अगबाई, घागर घेऊन जायचं झालं वाटतं. काय करायचं आतां माणसानं ?

**कनकांगी**—ताई, खरंच तूं मोठ्या नशिबाची ! तुझा नवरा घरीं पाणी भरतो! आणि आमच्या इकडे घरजांवई होऊन ऐतोबासारखं हातपाय न हालवितां, बायकोवर डोळे फाडायला मात्र समजतं. हा टुमदार आश्रम, ही नदी, हा

बगीचा, हरकाम्यासारखा राबणारा नवरा, याला म्हणावं कवीचा संसार ! कवि म्हणजे इथून तिथून बायकांची आरती ओवाळणारे असं म्हणतात म्हणून मी मुद्दाम राजकवीशीं लग्न केलं आणि आतां सगळं कवन माझ्याच अंगावर उलटलं आहे 'बसतां बुक्की आणि उठतां लाथ' हेच काय ते कवितेचे चरण माझ्या वांटयाला आले आहेत; मग चार घागरी पाणी आणायचं दूरच. लग्नापूर्वी काय माझी मनधरणी केली आणि लग्न झाल्याबरोबर नारसिंह अवताराला सुरुवात झाली. नको तो नवरा आणि नको तो संसार असं मला झालं आहे. त्यापेक्षां इथंच तुलसीदास महाराजांच्या सेवेला रहावंस वाटतं. तूं काय युक्ति केलीस ती तरी सांग मला. मी काय वाटेल तें करीन आणि चार घागरी पाणी आणायला लावीन तिकडे—त्या वेळीं माझ्या डोळ्याचं पारणं फिटेल. नवरा असावा तर तुझ्या नवऱ्यासारखा—

कलावती—असं बोलं नये वेड्यासारखं. परमेश्वरानं दिलेल्या स्थितींत सुख मानून पतीच्या इच्छेप्रमाणं वागणं यासारखा आम्हां बायकांना दुसरा मोक्ष नाहीं. बरं मी तिकडे विचारून येतें. हां आलेंच. [ जाते.

कनकांगी—इथपर्यंत तरी निभावलं ! काय आजीबाईसारख्या ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगते आहे पण ! तुझ्या बोलण्याचा तोरा मला समजतो बरं. आतां घरीं चल एकदां म्हणजे या आश्रमांत परत पाऊल टाकण्याची आशाच नको. खरंच, नवरा असावा तर असा पाणी आणणारा, हरकाम्यासारखा राबणारा, बायकोसाठीं जीव देणारा असावा. नाहीं तर आमच्या इकड हद्दपार होण्याचीदेखील छाती नाहीं.

तुलसीदास—( कलेसह प्रवेश करून ) मातोश्रींची प्रकृति अगदीं अत्यवस्थ आहे ! माझ्या कलेनं तिकडे आलंच पाहिजे अशी स्थिति आहे ?

कनकांगी—आजची रात्र जाईलसा भरंवसा नाहीं. ताईची एकदां दृष्टभेट व्हावी म्हणून आईनं ध्यास घेतला आहे. पूर्वीच्या प्रकाराबद्दल बाबांना आतां पुरा पस्तावा झाला आहे—म्हणून तर आईनं इतका ध्यास घेतला आहे. अखेरची भेट घेऊन ताई मागच्या पावलींच परत येईल. अशा वेळीं तिला पाठवून द्यावीच.

कलावती—महाराज, कन्येच्या कर्तव्याचं हं अखेरचं ऋण फेडण्याची मला परवानगी असावी.

तुलसीदास—मग मीही येतों तुझ्याबरोबर.

कलावती—तेवढं मात्र करायचं नाहीं. पैलतीरीं पाऊल टाकणं म्हणजे प्रत्यक्ष

काळाच्या दार्ढेत मान देण्यासारखं आहे, याचा इतक्यांत विसर पडला वाटतं ! मी अगदीं लौकर येतें; एक प्रहराच्या आंत येतें. माझं मन कसं बावरल्यासारखं झालं आहे—जाऊं मी ?

**तुलसीदास**—बरं तर. आजची रात्र मी कशी तरी कष्टानं कंठीन. उद्यां सूर्योदयाला मात्र परत आल्यावांचून राहूं नकोस. जा, शांत चित्तानं जा. तुझ्या आईला कांहीं होत नाहीं.

**कनकांगी**—म्हणजे, मीं सांगितलं तें सारं खोटं वाटतं ?

**कलावती**—अग, तसं नव्हे. माणसाला जातांना धीर देण्यासाठीं तसं म्हणायचं असतं.

**कनकांगी**—एवढंच ना ? हें काय बाई मला माहीत. चल तर आतां.

**कलावती**—मी येऊं ? अगदीं कष्टी व्हायचं नाहीं—आनंदांत असायचं. मी इथं नाहीं, तेव्हां आपल्याला पुढची रामायणाची कथा एकाग्र चित्तानं लिहायला आज छान वेळ मिळेल; त्या नादांत आपला वेळ सहज निघून जाईल. नदीपलीकडे गांवांत येण्याचं धाडस करायचं नाहीं व असलं कांहीं मनांतदेखील आणायचं नाहीं.

**तुलसीदास**—माझ्या सुखस्वप्नाचा असा भंग करणं तुला योग्य वाटतं ना ?

**कलावती**—महाराज ! कर्तव्य हें नेहमीं निष्ठुर असतं, हें आपल्याला मीं सांगावं असं नाहीं. कर्तव्यनिष्ठ कन्याच कर्तव्यनिष्ठ पत्नी होऊं शकते ना ?

**तुलसीदास**—प्रपंचांतील रूक्ष कर्तव्याची मला पर्वा नाहीं. तूं परत येशील, ती कर्तव्यनिष्ठ पत्नी या नात्यानं नको; प्रेमातुर वल्लभेप्रमाणं—अभिसारिकेच्या भावनेनं या तुझ्या सोत्कंठ वल्लभाला भेटण्याकरितां यावीस म्हणून मी तुला जाऊं देतों.

**कलावती**—बरं, तसं कां होईना. एकूण काय, रामायण लिहिण्याचा विचार नाहीं दिसत. कृतसंकल्पाची विस्मृति व्हावी हें बरं का ? मीच अभागी—आपला काय दोष ? बरं, येऊं मी ? पैलतीरीं यायचं नाहीं—पुन्हा सांगतें—

**कनकांगी**—कलाताई, चल लौकर, आभाळ भरून आलं. कदाचित् वादळ होईल. [ दोघी जातात.

तुलसीदास—

२८. पद

**कां मनिं येइ उदासीनता? । रम्य रजनी दिन संधिकाल परि, हृदय वरी खिन्नता ॥ ध्रु०॥ निद्रा जाइल प्रिये मागुती। कुटिल रात्रिसी प्रसंग आतां ॥ १ ॥** [ पडदा.

---

## प्रवेश तिसरा

[ स्थळ—दीनबंधूचें घर. पात्रें—दीनबंधु, कवि भुजंग व अमात्य जटाशंकर प्रवेश करितात.]

दीनबंधु—माझ्या पूर्वजांनीं केलेल्या कमाईचं पुण्य फळाला आलं ! माझं घर पवित्र झालं ! या आसनावर बसावं. माझ्यासारख्या यःकश्चित् दासानुदासाच्या झोंपडीकडे आपल्यासारख्यांनीं पायधूळ झाडावी हें माझं केवढं भाग्य !

जटाशंकर—मी तुमच्या घरीं आदरसत्कार घेण्याकरितां आलों नाहीं. माझा हेतु तडीला नेण्याची तुम्हीं जिम्मेदारी घेतलीत आणि मुद्दाम तुमचा तसा निरोप आला म्हणून मी तांतडीनं थोडा परिवार घेऊन निघून आलों. औपचारिक आदरातिथ्यानं किंवा गोडीगुलाबीच्या शुष्क भाषेनं माझं समाधान होईल असा तुम्हांला भ्रम असेल तर तो डोक्यांतून काढून टाका.

दीनबंधु—अन्नदाता, गरीबपरवर—मी आणि आपल्याशीं बेइमान होईन ? सम्राटाची आणि आपली मर्जी सुप्रसन्न करूनच मला माझ्या घराण्याचा लौकिक वाढवावयाचा आहे सम्राटाचा श्वशुर होऊन राजाबहादुर हा किताब मिळविण्याची माझी हौस इतक्यांतच मावळली असं हुजूरनीं समजूं नये. मी राजाबहादुर या पदवीला पूर्णपणें लायक आहे याविषयीं हुजूरची खात्री लौकरच होईल.

जटाशंकर—आजपर्यंत या बाबतींत काय केलंत ? स्वस्थ बसून माशा मारल्या ?

दीनबंधु—माशा कां मारीन ? सम्राटाच्या समशेरीचा माशा मारण्याकडे उपयोग करणारा हा भावी राजाबहादुर नव्हे ! त्या माझ्या कुलांगार कार्टीला

लग्नकार्यानिमित्तानं घराकडे घुलवून आणावी, म्हणून सम्राटानं नजर केलेल्या समशेरीच्या जोरावर, माझ्या धाकट्या कन्येचं या राजकवीशीं तांतडीनं लग्न लावलं, ही पहिली गोष्ट.

भुजंग—अगदीं खरं. तरवारीचं पातं दाखवून डोळ्यांचं पातं न लवूं देतां यांनीं आपल्या कनिष्ठ कन्येशीं माझं लग्न लावलं खरं.

दीनबंधु—केवळ सम्राटाचा हेतु साध्य करण्याकरितां मी या सम्राटाच्या समशेरीचा उपयोग करीत असतों, याची खातरजमा हुजूरचरणीं यावरून झालीच असेल. तुलसीदासाला सुद्धां मी बादशाही तरवारीचं पाणी चाखायला लावणार होतों; परंतु विधवेपेक्षां सौभाग्यवतीचा नजराणा बादशहाला विशेष मान्य होईल असा विचार करून, मीं तुलसीदासाला सोडून दिला. प्रत्यक्ष बहिणीवर अक्षता टाकायला सुद्धां ती उलटया काळजाची कार्टी आली नाहीं, यामुळं माझा डाव त्या वेळीं फसला; हुजूरची मी माफी चहातों.

जटाशंकर—मला हा पाल्हाळ नको आहे. तुमची मुलगी माझ्या कब्जांत आली पाहिजे. शाहीदरबारांतील माझ्या प्रतिस्पर्ध्यांनीं, प्रयत्नाची शिकस्त करून, दिल्लीपतीचा जनानखाना रजपूत घराण्यांतील सुंदर स्त्रियांनीं सुशोभित केला आहे आणि माझ्या हातून एकाही हिंदु स्त्रीचा नजराणा सम्राटाला अर्पण होऊं नये या पलीकडे नामुष्की कोणती? या खेपेलाही जर मी हात हालवीत परत फिरलों तर तुमच्या घरादारावर नांगर फिरलाच असें समजा. माझ्या अंगीं अद्यापि येवढं सामर्थ्य आहे हें विसरूं नका.

भुजंग—(स्वगत) बादशहाचा प्रतिनिधि म्हणजे नांगराचा बैलच!

दीनबंधु—अन्नदाता, आपलं सामर्थ्य विसरून आमचं कसं चालेल? आम्हांला सर्व कांहीं आपणच आहांत. या खेपेला माझा वार वायां जाणार नाहीं, याबद्दल खात्री असावी. तुझी आई अत्यवस्थ आहे, तेव्हां अखेरच्या दृष्टभेटीला तरी ये असा निरोप घेऊन खुद्द कनकांगीला—माझ्या धाकट्या मुलीला—तिच्याकडे नावेतून पाठविली आहे. ती काम फत्ते करून इतक्यांत येईल.

भुजंग—फार काय, पण तुझी आई मेली म्हणून सुद्धां निरोप पाठवायला आमची तयारी होती!

दीनबंधु—हो अलबत् होती. हुजूरकामगिरीपुढं बायकोच्या जगण्यामरण्याचं काय महत्त्व आहे? पण 'आई तर मेली—आतां जाऊन काय करायचं?'

असलं; शंका काढायला देखील ती कार्टी मागंपुढं पहायची नाहीं, म्हणून, 'अगदीं घटका घातली आहे' असा निरोप पाठविला आहे.

भुजंग—यावरून सम्राटाच्या कार्याकरितां श्रीमान् दीनबंधु किती जागत्या जीवानें झटत असतात, किती सूक्ष्म सूत्रं संभाळीत असतात, किती धागेधोरणं धरून ठेवतात याची हुजूरना कल्पना आलीच असेल.

दीनबंधु—माझे हे घरजांवई राजकवि देखील मला या कामांत घर समजून जिवाभावानं मदत करीत असतात, हें हुजूरचरणीं मोठ्या आनंदानं आणि कृतज्ञ अंतःकरणानं निवेदन करण्याची मी परवानगी घेतों.

भुजंग—गरिबपरवर, पोटच्या पोरीशीं यांनीं तरवारीच्या पात्याच्या जोरावर माझं लग्न लावलं खरं; पण आमच्या या कारस्थानांत तिचा पुढें वाटेल तसा उपयोग करून घेतां यावा म्हणून मींही तिला तरवारीच्या धारेखालीं ठेविली आहे. एका अर्थानं आम्ही हें असिधाराव्रतच आचरीत आहोंत ! एवढं खरं कीं, कोमल काव्यानं रसिक रमणी वश होते; पण कराल कट्यारीनं कसलीही कर्कशा कबजांत राहते—कट्यार मुठींत असली, कीं बायको मुठींत आलीच ! सम्राटाच्या सेवेखातर तूर्त काव्य सोडून मीं बायको मुठींत ठेविली आहे या दृष्टीनं माझी पत्नी म्हणजे काव्यकुठारच झाली आहे; पण नाइलाज आहे. सम्राटाचं सुख म्हणजे साम्राज्याचं हित आणि त्याकरितांच ही मुठींत कट्यार आहे–ही पहा माझी कुठार तुलसीदासावर घाव घालून काम फत्ते करून आली !

कनकांगी—( प्रवेश करून ) बाबा, मला शाबासकी द्या आधीं ! आणली कीं नाहीं कलाताईला ?

दीनबंधु—कुठें आहे ती ?

जटाशंकर—अहो राजकवि, तुम्ही खालीं जा आणि दरवाजावर पाळत ठेवा, माझ्या लोकांना तयार रहायला सांगा—पण ती आहे कुठं ?

कनकांगी—आईजवळ खालीं बसली आहे. बाबा, आईला थोडी अफूची गोळी तरी द्यायची होती. जरा गुंगून पडली असती म्हणजे तितकं बरं दिसलं असतं ! आईला कांहीं विशेष होत नाहीं हें पाहतांच ताई जायला निघाली—आईनं जरा बसवून घेतली आहे म्हणून बरें—नाहीं तर ती जायचीच.

जटाशंकर—अहो भुजंग, तुम्ही आधीं दरवाजा रोखा–चला.

कनकांगी—( भुजंगाला पाहून ) अग आई ग—थकून गेलें अगदीं—घेरी येऊं लागली आहे मला—आधीं पाण्याची एक घागर आणून द्या मला आणि मग दरवाजावर पाहिजे तर पहारा करीत बसा—जीव कसा कासावीस झाला !

भुजंग—कोणाला ? मला सांगतेस घागर आणायला ? हें पाहिलंस काय आहे ? ( कट्यार दाखवितो.)

कनकांगी—आणि तुलसीदास पाणी आणतात ते ! घागरभर पाणी आणून एखाद्या गोष्टींत तरी त्यांच्यावर ताण करायची होती.

भुजंग—चुप बैस ! तुलसीदास भुक्कड पाणक्या असेल. मी राजकवि तुला या कट्यारीचं मात्र पाणी पाजीन—

जटाशंकर—तुम्ही आधीं खालीं जा म्हणून मी सांगतोंना ? माझ्या नोकरांना तयार रहायला सांगा.

दीनबंधु—अन्नदाता, आस्तेकदम, जरा दमानं घ्यावं. अशा उतावळीनं सर्व मामला बिघडून जाईल. मी सर्व योजना कशी ठीक करतों पहा.

जटाशंकर—काय आहे तुमची योजना ?

दीनबंधु—आपण आतां सर्वजण मध्यरात्रीपर्यंत कुठं तरी वेळ काढूं. रात्रीचा वेळ काढायला इथं कांहीं कमी ठिकाणं नाहींत. किंचित् नाचगाण्याच्या रागरंगांत तोंपर्यंत हुजूरनीं जीव रिझवावा अशी विनंति आहे. आपला परिवारही बरोबरच घेऊन चलावं—म्हणजे लोकांना या घरांत कांहीं विशेष गडबड दिसायला नको. त्या बदमाष तुलसीदासाचे भक्त, स्नेहीमंडळी वगैरे बरेचसे राजद्रोही या शहरांत आहेत. कार्टीनं कुठं आरडाओरडा केला म्हणजे सगळाच त्या सैतानांचा घोळका जमून हातची पोर जायची. म्हणून म्हणतों, चोहोंकडे सामसूम झालं म्हणजे पुन्हा मध्यरात्रीच्या सुमारास आपण इथं परत येऊं; कीं कोणाला मागमूस न लागतां काम फत्ते ! सूर्योदयापूर्वी आपण दिल्लीला पोहोंचालं !

जटाशंकर—आणि आपल्यामागं ती निघून गेली म्हणजे ?

दीनबंधु—मी इतका कच्चा नाहीं. कनकांगी—ए पोरी, मी काय म्हणतों तें नीट ऐक—आणखी आमचं एवढं काम केलंस कीं तूं सांगशील तें तुझ्या-साठीं मी करीन.

कनकांगी—त्यांना चार घागरी पाणी आणायला लावा, तर मी तुमचं वाटेल तें काम करीन.

दीनबंधु--बरं, कबूल. आतां नीट लक्ष देऊन ऐक. आम्ही सर्वजण आतां येथून परस्पर बाहेरच्या जिन्यानं जातों. ती कार्टी मला भेटायला म्हणून वर येईल-नाहीं तर तूंच तिला वर बोलाव, आणि कांहींतरी निमित्तानं तिला त्या शेजारच्या खोलींत पाठवून दे; आणि ती आंत गेली म्हणजे बाहेरून कडी कुलूप लावून घे. आम्ही परत येईपर्यंत कोणत्याही कारणानं दरवाजा उघडूं नकोस कीं तिला बाहेर यऊं देऊं नकोस. नीट ध्यानांत ठेव. जांवई-बोवा, चांगलं बजावा तिला.

भुजंग—काय सांगितलं तें नीट लक्षांत ठेव-नाहीं तर या कट्यारीशीं गांठ पडेल.

कनकांगी—पहा, ही कामगिरी देखील मी कशी करतें ती! कलाताईला इथं आणायचं काम कसं केलं? मग हें तर काय अगदींच सोपं! वाटेल त्याला मी कोंडून ठेवीन-मग कलाताईची काय प्रतिष्ठा!

दीनबंधु—शाबास, तरी माझी कनकांगी--उगीच नाहीं.

जटाशंकर--चला तर आतां, वेळ होतो. [ दोघे जातात.

भुजंग—जर का घोंटाळा केलास तर— [ कट्यार दाखवून जातो.

कनकांगी—( स्वगत ) सारं शौर्य मेलं बायकोभोंवतीं दाखवायचं. तुलसी-दासाप्रमाणं अंतःकरण मायाळू असेल-त्यांतून हे राजकवि-म्हणून यांच्याशीं लग्न लावलं; पण कवीच्या ऐवजीं खविसाशीं मात्र गांठ पडली आहे! बायको-साठीं पाण्याची एक घागर आणवेना आणि तुलसीदासाला पाण्यांत पाहतात. त्यांची योग्यता कशाला? त्याचं रूप काय, बोलणं किती गोड, स्वभाव किती मायाळू! प्रतिनिधि नशिबानं आयते घरीं चालून आलेले—त्यांच्यावर डोळे फाडून थोडी शिवीगाळ करून त्यांचा अपमान करायचा-म्हणजे हद्दपार होण्याची कशी सोन्यासारखी संधि आली होती! तें सारं सोडून मलाच आपली सुळावर धरायची! ताई कोठून नशीब घेऊन आली आहे कोणास ठाऊक-खरंच नवरा असावा तर तुलसीदासासारखा असावा! नाहींतर हे आमचे अवचित पीर!

कलावती--( प्रवेश करून ) कनकांगी, तूं इतकं खोटं बोलायला कधीं

शिकलीस? आईची प्रकृति अलीकडे वर्षभर आहे तशीच आहे, आणि आजची रात्रदेखील जाणार नाहीं असं भलतंच अभद्र बोलून, मला इथं घेऊन आलीस याचं कारण काय?

कनकांगी—रोग्याला समजतं वाटतं आपल्याला काय होतं तें? आपण बेशुद्ध झाली होती तें आईला कसं कळणार? बेशुद्ध माणसाला कांहीं कळत असतं वाटतं? आम्ही मात्र सगळी घाबरून गेलों होतों; आणि म्हणूनच तुला बोलावून आणिली. आमचं काय जात होतं? तुलाच आई भेटली नसती.

कलावती—(स्वगत) इला मूर्ख म्हणावं कीं दुष्ट म्हणावं, हेंच समजत नाहीं. (प्रगट) तूं माझी बहीण नव्हेस पण वैरीण-निदान आज तरी वैरीण झालीस. आश्रमांतून आज तरी तूं मला घेऊन यायला नको होतं. माझ्या जीवितकर्तव्याच्या सुखांत असा व्यत्यय आणून, चांडाळणी, तूं माझं वैर साधलंस खरं.

कनकांगी—ठाऊक आहे मला तुझं सुख. नवऱ्याला घागरी उचलतांना पाहण्यांत सुख असतं खरं; पण रोज रोज तेंच काय पहायचं मेलं. उद्यां परत गेलीस म्हणजे आहेच पुन्हा-नवरा कुठं पळून जात नाहीं कीं तुला कोणी पळवून नेत नाहीं.

कलावती—आतां मी इथं रहात नाहीं. बाबांना नमस्कार करून मी परत जातें. बाबा कुठें आहेत?

कनकांगी—बाबा गेले आहेत गाणं ऐकायला अमात्यांबरोबर—

कलावती—काय म्हटलंस-पुन्हा बोल-कोणाबरोबर गेले?

कनकांगी—अगबाई! अशी अंगावर काय येतेस? अग आई ग! माझा जीव घाबरला-घेरी येऊं लागली मला-पाणी, पाणी-त्या पलीकडच्या खोलींत आहे-आधीं आण जा चांडाळणी!

कलावती—(घाबरून) अग, असे डोळे फिरवायला काय लागलीस-अरे देवा! ही बेशुद्ध झाली-पाणी कुठं आहे तें जळ्ळं—

[पाणी आणायला खोलींत जाते व कनकांगी दार बंद करून कडीकुलूप घालते.]

कनकांगी—(स्वगत) भली सांपडलीस! काय वेळेवर पाण्याची युक्ति सुचली! खुशाल दरवाजावर डोकं फोडून घे म्हणावं! मला वैरीण म्हणतेस? चांडाळीण म्हणतेस? आणि तुलसीदासासारख्या मायाळू सुंदर नवऱ्याच्या

गळयांत आप्पलपोटेपणानं चोरून माळ घातलीस त्या वेळीं तुला माझी आठवण झाली होती का ? काय बयेचं नशीब तरी पहा ! इतका इचा आपमतलबी स्वभाव, पण बाबांची आणि अमात्यांची सारी खटपट, आपली तिलाच बादशहाची बिब्बी करायची ! मी बिब्बी व्हायला एका पायावर तयार आहे, पण माझ्याकडे कोणीच पहात नाहीं. ताईचं नशीब थोर खरं—पण नाहीं, यांत नशिबापेक्षां तिच्या नवऱ्यांतच कांहींतरी गुण आहे. तुलसीदासाच्या अंगांतच कांहींतरी जादू आहे, म्हणून त्याच्या बायकोची इतकी प्रतिष्ठा. ताईच्या मागं मीं जर तिची जागा पटकावली तर पुढे कांहीं दिवसांनीं, मी देखील राजाची राणी कां नाहीं होणार ? माझं लग्न होऊन सारी अडचण झाली आहे. पण मनांत आल्यावर अडचण कसली ? कलाताईचंही लग्न झालं आहे त्याची कुठं बाबांना अडचण वाटते ? मग मला तरी लग्न झाल्याची पर्वा कां वाटावी ? बाबांचाच कित्ता मी गिरवणार. आमच्या यांच्याकडून हद्दपार होणंही होत नाहीं कीं चार घागरी पाणी भरणं होत नाहीं. कट्यारीच्या आणि कमचीच्या भीतीनं जीव मुठींत धरून जन्म काढायचा, त्यापेक्षां तुलसीदासांच्या सहवासांत राहणं काय वाईट ? आतां बाबा येईपर्यंत या माझ्या पुढील बेताचा नीट विचार करून ठेवावा. काय वाटेल तें करून तुलसीदासांचं मन मी वळवणारच ! आतां मध्यरात्रीपर्यंत उगीच जागत बसायची पाळी आली आहे. डोळ्यांत झोंप कशी भरून राहिली आहे, आणि त्यांतून आश्रमांत पाहिलेली तुलसीदासांची मूर्ति डोळ्यांसमोर सारखी उभी राहते—डोळे मिटून पडावं हें बरं. ( निजते.) [ पडदा.

---

## प्रवेश चवथा

[स्थळ—दीनबंधूच्या वाड्यामागील बगीचा. घटीशेखर प्रवेश करितो.]

घटीशेखर—(स्वगत) माझ्या नशिबाची कमान चढते आहे खास ! हा दीनबंधु कांहींतरी विलक्षण भानगडींत आहे. आणि ही अंधारांतील भानगड काय आहे, याचा सुगावा लावून उद्यां गांवभर दवंडी पिटण्यासाठीं, मी या अंधारांत तब्बल दोन घटका दबा धरून बसलों आहें; पण अजून कोणाची चाहूल लागली नाहीं. संध्याकाळीं कनकांगी नदीपलीकडे नावेंतून एकटीच गेली आणि

थोरल्या बहिणीला घेऊन ताबडतोब परत आली, हें मीं समक्ष नदीकांठावरून पाहिलं. अमात्य जटाशंकरही येथें आल्याची खबर आहे. पण खासगी कामाकरितां ते आल्यामुळं, त्यांच्या येण्याची दवंडी देतां येत नाहीं. त्यांचा मुक्काम या दीनबंधूच्या घरींच आहे म्हणे. या बड्या धेंडाचं काय कारस्थान चाललं आहे तें कळण्याकरितां मी माझ्या अंगाचं चामडं काढून देईन. फार काय, त्याच चामड्यानं माझं घटिकापात्र मढवून गांवभर दवंडी देईन.–पण तसं कोठून जुळणार? आँ! अशा काळोखांत हा कोण इकडे येत आहे? आतां इथंच दगडासारखं स्वस्थ बसावं. (दबा धरून बसतो.)

तुलसीदास--( प्रवेश करून ) नेहमीं संथपणें वाहणाऱ्या नदीप्रवाहाला तुफान पर्जन्यामुळं केवढी ओढ लागते. माझ्या कलेच्या ओढीमुळं तसल्या ओढाळ प्रवाहालाही तोडण्याचं सामर्थ्य माझ्या अंगीं आलं! आतुरतेसारखं आत्मबल नाहीं आणि उत्कंठेसारखी ओढ नाहीं. या राजपुरच्या हद्दींत पाऊल ठेवल्यापासून मी यमराजाच्या अंगणांत निःशंकपणें वावरत आहें तो या आतुरतेच्याच सामर्थ्यावर. उत्कंठेच्या ओढीनं मी या दीनबंधूच्या बगीचांत तर आलोंच. इथं येण्यांत मीं माझ्या कलेची अवज्ञा केली खरी; पण मी तरी काय करूं? एक प्रहर तिची मार्गप्रतीक्षा करूनही, ती परत येण्याचं कांहींच चिन्ह दिसेना, तेव्हां आतुरता अनावर होऊन तिनं संयमनाचे सर्व धागे ताडकन् तोडले; आणि नदीच्या प्रचंड प्रवाहांतून एका तराफ्याच्या साहाय्यानं मला पैलतीरीं पोंचविलं. आतां या घरांत प्रवेश कसा करून घ्यावा? (पाहून) हाँ! या खोलींत उजेड दिसतो आहे. माझी कला निद्रावश न होतां माझं चिंतन करीत बसली असेल का? हो–माझ्या येण्याची ती मार्गप्रतीक्षा करीत नसेल तरी कशावरून? प्रणयी जीवाचं मनोमन साक्ष असतं. येते वेळीं मला तिनं या शहराच्या हद्दींत पाऊल न टाकण्याविषयीं पुनःपुन्हा निक्षून सांगितलं होतं, त्याचा अर्थ किंबहुना मीं तिच्या भेटीला यावं असाच असला पाहिजे. स्त्रियांचं मनोगत आणि भाषण यांमध्यें नेहमीं विरोध असतो, त्याचाच हा एक मासला! शंकाच नको. माझं इथें येणं अगदीं रास्त आणि अपेक्षित आहे खास. (खिडकीजवळ लोंबणाऱ्या सर्पाकडे पाहून) आहाहा! हें त्याचं दुसरं प्रत्यंतर! मला गुप्तपणें तिच्या अंतःपुरांत प्रवेश करितां यावा म्हणून काव्यमय नायिकेच्या वृत्तीला अनुसरून तिनं या खिडकीनजीक दोरी-

सुद्धां बांधून ठेवली आहे ! ! मग आतां विचार कसला ? या दगडावर चढून दोरच्यिा आधारानं वर जावंच.

[ घटीशेखरच्या डोकीवरं पाय देऊन दोर समजून सर्पाला धरून चढून जातो.]

घटीशेखर—( पुढें येऊन ) अगदीं अट्टल दिसतो आहे ! प्रतिनिधींच्या परिवारापैकीं कोणीतरी खास दिल्लीचा बदमाष असला पाहिजे ! इकडे तिकडे टेहेळणी करतां करतां, आपला बेफिकीर माझ्या डोक्यावर पाय देऊन दोरी धरून सफाईनं चढून गेला ! जीवाच्या भयानं मलाही कांहीं हालचाल करतां येईना ! मी त्याला बरा उंच दगड सांपडलों ! पण आतां काय चैन झाली माझी ! हा चोर असला तर चोरीची दवंडी द्यायला छान बातमी मिळाली ! दुसरा कांहीं गुपचुप घोंटाळा असला तर मग काय बहारच उडाली ! पण इथं असं तिष्ठत उभं राहून काय उपयोग ? या गोष्टीचा पुरा छडा लावल्यावांचून मला कांहीं दम निघत नाहीं. छेः ! मला आतां नाहींच राहवत. आपणही या दोरीच्या आधारानं चढून जावं आणि कुठं तरी वर दडून, काय काय प्रकार होतो तो पहावा. भित्र्या भागुबाईला बायको मिळत नाहीं म्हणतात–पण मी म्हणतों भित्र्या भागुबाईला बातमीही मिळत नाहीं. काय प्रसंग येईल तो पाहून घेईन. माझ्या दवंडीच्या धमकीपुढं मोठमोठे नरम पडतात. आतां नाहींच रहावत— [ चढून जातो.

---

## प्रवेश पांचवा

[ स्थळ—दीनबंधूचा दिवाणखाना. कनकांगी कोचावर पाठमोरी निजलेली आहे.]

तुलसीदास—( हलकेच प्रवेश करून ) प्रकाशाच्या अनुरोधानं मीं या अंतःपुरांत प्रवेश तर केलाच–पण चुकून भलत्या ठिकाणीं तर आलों नाहीं. ना ? छेः शंकाच नको. प्रियजनाच्या मीलनाकरितां प्रेमी जीवानं बुद्धिसर्वस्व खर्चून योजिलेलं अनुसंधान अचुक असतं. आहाहा ! ही पहा माझी कला ! मूर्तिमंत काव्यकल्पना ! माझ्या भेटीची निराशा झाल्यामुळं, जणुं काय दैवावर रुष्ट होऊन तिनं त्याला पाठमोरं केलं आहे; पण या निद्रित सौंदर्याचं जर मी असं नुसतं कौतुकच करीत राहिलों, तर उरलेली रात्र केव्हांच संपेल. इला जागी करावी कशी ? इच्या केशकलापाची वेणी बांधण्याचं कौशल्य जर माझ्या

अंगीं असतं तर किती बहार झाली असती ! पण या वेळीं वेणी बांधण्यापेक्षां वेणी सोडण्यांतच बहार आहे !

[ तिच्या वेणीस स्पर्श करितो ती दचकून जागी होते; व वळून पाहते.]

तुलसीदास—( आश्चर्यानें ) कोण तूं ? कनकांगी ?

कनकांगी—अग बाई, कोण ?-तुलसीदास-तुम्ही आणि इथं ?

तुलसीदास—राम राम, परस्त्रीला स्पर्श ! माझे पापी हात एकदम गळून कां गेले नाहींत ?

कनकांगी—महाराज, परस्त्रीच्या स्पर्शाचं पाप तिला आपलीशी करून धुऊन टाकावं.

तुलसीदास—राम राम ! काय हें भाषण ! माझ्या अंगांतील उन्माद माझ्या स्पर्शानं तुझ्या अंगांत शिरला कीं काय ? तुझी बहीण–माझी कला कुठं आहे तें आधीं सांग. अज्ञानानं चुकून मी तुझ्या मंदिरांत आलों, याची मला क्षमा कर आणि माझ्या कलेला इकडे पाठवून दे. जा–परपुरुषाशीं एकान्तात एक क्षणभरही राहूं नकोस. आधीं जा, आणि माझ्या कलेला इकडे पाठवून दे.

कनकांगी—महाराज, आतां आपण कलाताईची आशा सोडून द्या—

तुलसीदास—आशा सोडून देऊं ? कलेवांचून कवि तुलसीचें जीवित अशक्य ! मी आशा काय म्हणून सोडूं ? कल्पान्तींही अशक्य.

कनकांगी—पण ही कनकांगी, कलेची बहीण, आपल्या चरणाची दासी व्हायला तयार आहे. कलेचा नाद सोडून या कनकांगीला पदरांत घेतली तर—

तुलसीदास—एक शब्दही पुढं बोलूं नकोस. कनकांगीचा काय, पण कन-कांग मेरु पर्वताच्या मोहानं देखील, मी माझ्या कलेला दूर करणार नाहीं. माझी कला कुठं आहे, सांग.

कनकांगी—कलेला दूर करणार नाहीं ? तर मग या जन्मीं तरी आपली आणि तिची भेट होणार नाहीं ! या पलीकडच्या खोलींत या कनकांगीच्या बंदींत आपली लाडकी कला सांपडली आहे ! आणखी एक घटकेच्या आंत, बादशहाच्या जनानखान्याची तिला वाट धरावी लागेल. समजलां ? अमात्य जटाशंकर मुद्दाम तिला नेण्याकरितां इथं आले आहेत. यापुढं कवीची कला मोगलबादशहाच्या जनानखान्यांत कुजत राहणार ! तुमच्यासारख्या हद्दपार

दरिद्री कवीच्या हातून तिची सुटका होणं अशक्य आहे. म्हणून मी पुन्हा आपल्याला सांगतें कीं, कलाताईचा नाद सोडून जर माझा स्वीकार—

तुलसीदास—कुलटे, पुन्हा तेच ते निर्लज्ज शब्द ऐकण्याची माझी इच्छा नाहीं. कलेच्या जिवाला कांहीं धोका नाहीं तोंपर्यंत मी मुळींच डगमगत नाहीं. अखिल विश्वांत अखंड माधुर्य पसरणाऱ्या परमेश्वरी संकेतावर माझा अढळ विश्वास आहे, आणि त्या दिव्य संकेताला अनुसरून निष्कलंक कलेचा व कलासक्त कवीचा संगम घडवून आणण्याची सर्व जवाबदारी त्या जगचालकाकडे आहे. तुझ्यासारख्या स्वैरिणीपुढं ही विश्वरहस्याची गीता सांगून काय उपयोग? व्यभिचारिणी कुलटा तूं! आश्चर्य इतकंच कीं, कुलवान् कलावती आणि कुलांगार कनकांगी एकाच मातेच्या उदरीं जन्माला याव्यात! अथवा आश्चर्य कसलं? सुधा व सुरा एकाच सागराच्या पोटीं निर्माण झाल्या!

कनकांगी—मी दुराचारी, व्यभिचारी, कुलांगार, कुलटा काय? असल्या शिव्या द्यायला, तुम्ही काय माझे लग्नाचे नवरे आहांत काय? मी व्यभिचारिणी काय? तर मग माझ्या मंदिरांत अपरात्रीं चोरून शिरणारा कवि व्यभिचारी ठरतो, कीं मी व्यभिचारिणी ठरते तेंच आतां दाखवितें! या शहराच्या हद्दींत पाऊल टाकल्याबद्दल तुम्हांला देहान्त शिक्षा ठरलेलीच आहे; पण सुळावर चढण्यापूर्वी कवीच्या दुराचाराचा डांगोरा जगभर झालाच पाहिजे. अजून विचार करा आणि माझं म्हणणं मान्य करा; नाहीं तर जिवाची आशा सोडा! आत्तां आरडाओरड करून घर जागवितें पहा—मग मात्र सुटका होणं अशक्य.

तुलसीदास—तूं घर जागव किंवा वाटेल तितका आक्रोश कर. जीविताच्या आशेनं आत्म्याचा अधःपात करून घेणारा हा तुलसीदास नव्हे. माझ्या निष्कलंक भावनेपुढं तुझ्या पापवासनेचा काय प्रकाश पडणार?

कनकांगी—होय का? तर मग तुमच्या दुराचाराचा डांगोरा जर जगभर नाहीं पिटला तर ही कनकांगीच नव्हे. माझं तोंड कोण धरणार?

घटीशेखर—( एकदम पुढें येऊन ) आपलं तोंड मी धरणार—डांगोरा पिटण्याचा अधिकार आपल्या तोंडाला नाहीं—तो माझ्या तोंडाला आहे. दवंडी-काव्य करण्याचा अधिकार जसा आपल्या पतिराज राजकवीचा आहे, तसा डांगोरा पिटण्याचा अधिकार या घटिशेखराचा आहे. आणि आपल्या दुराचाराचा डांगोरा जर मीं जगभर नाहीं पिटला तर हा दवंडीबहादुरच नव्हे!

कनकांगी—तूं इथं कसा आलास मेल्या—

घटीशेखर—मेला इथं कसातरी आला खरा, आणि मेल्यानं आपलीं सर्वं मुक्ताफळं चोरून ऐकलीं बरं! मेल्यानं दवंडी-काव्यसुद्धां तयार केलं आहे. आणि शेवटीं मेला आपल्यापुढं असा जिवंत उभा आहे! माझ्या डोकींत मारलेल्या थाळीचा वण अद्यापि बुजला नाहीं. [ दरवाजावर थाप ऐकूं येते.

कनकांगी—अरे माझ्या कर्मा! तिकडून यायचं झालं वाटतं! महाराज, मी तुमच्या पायां पडतें. आपण त्या खोलींत कृपा करून जा.

[ कनकांगी खोलीचें कुलूप काढते; तुलसीदास आंत जातो.]

तुलसीदास—( जातांना ) माझी कला आंत आहे ना? मग विश्वाच्या अन्तापर्यंत मला तिच्या सहवासांत खुशाल कोंडून ठेव.

कनकांगी—( घटीशेखराला ) तूंही आंत जा. तुझ्या पायां पडतें. परपुरुषाला माझ्या खोलींत पाहिला तर माझा प्राणच घेतील.

घटीशेखर—हें आतां सुचलं वाटतं? तुलसीदास मघाशीं परपुरुष वाटला नाहीं कुठं?

कनकांगी—कृपाकरून आंत जा; तुझ्यापुढं पदर पसरतें!

घटीशेखर—आतां चांगली सांपडलीस माझ्या तडाक्यांत! मी एक पाऊलहीं येथून हालणार नाहीं. तुझ्या नवऱ्याकडून दुहेरी बक्षीस घेईन तेव्हांच येथून जाईन. एक बक्षीस, बायकोच्या बाबतींत तोंड बंद ठेवण्याबद्दल आणि दुसरं, तुलसीदासाला पकडून दिल्याबद्दल. आज माझं उखळ पांढरं होणार—जन्माची ददात मिटली. असं आहे, धाडसावांचून दौलत मिळत नसते!

कनकांगी—होय का? थांब तर मेल्या—( त्याचे हात धरून ओरडते.) धावा हो धावा—या मेल्या मांगापासून मला सोडवा—मेल्या सोड, तुझं निसंतान होवो—( दरवाजा फोडून भुजंग आंत येतो.) हा पहा हो! अपरात्रीं खोलींत शिरून माझ्यावर हा दांडगा बलात्कार करतो आहे!

भुजंग—कोण घटीशास्त्री? अरे लेका! तुझ्या नीचपणाची आणि धारिष्टाची मजल इथपर्यंत गेली का? तुझी इतके दिवस कींव केली त्याचे उपकार असे फेडलेस काय? बदमाप! थांब, तुझी या चाबकानं चामडीच लोळवितों. ( त्याला चाबकानं मारतो.)

घटीशेखर—अहो! तुम्ही माझी चामडी लोळवा—मी त्या तयारीनंच आलों होतों. पण माझं म्हणणं—

[ तिघांची मारामारी व बोलाचाली पुढें होत असतांना, त्यांना न कळत तुलसीदास व कला मागल्या मार्गे निघून जातात.]

**भुजंग**—तुझा जीवच घेतों तूं काय समजलास? तुझ्या नरडीचा घोट घेतों. पतिव्रतेच्या अंगाला हात लावला म्हणजे प्राणावर बेततं-काय समजलास? कोणाच्या अंगाला हात लावला म्हणजे? (मारतो.)

**घटीशेखर**—पतिव्रतेच्या-साध्वीच्या! अहो, तुम्ही माझा प्राण घ्या, पण त्यापूर्वी मला अखेरची दवंडी तुमच्यापुढं पिटूं द्या.

**भुजंग**—तुला आधीं चांगला पिटतो. ( मारतो.)

**घटीशेखर**—अहो, मी काय सांगतों तें ऐकून तरी घ्या, मग मी सुखानं मरेन.

**कनकांगी**—मेल्याचं कांहींसुद्धां ऐकूं नका-आतां काय वाटेल ती बतावणी करील-मेल्याला चांगला झोडपून काढा-मरूं दे मेला!

**घटीशेखर**—अहो, मरतांना कां मी खोटं बोलेन? तुलसीदास माझ्या पूर्वींच इथं आला आहे आणि या वेळीं तो पलीकडच्या खोलींत आहे.

**भुजंग**—तुलसीदास! कुठं आहे तुलसीदास? भरलींच त्याचीं शंभर वर्षं. (खोलींत जाऊन पाहून येतो.) खोलींत कोणीच नाहीं आणि तुझी बहीण कुठं आहे?

**कनकांगी**—काय कोणीच नाहीं? अरे देवा! दोघंही पळून गेलीं वाटतं! दोघांनींही आमच्या हातावर तुरी दिल्या!

**भुजंग**—अवदसे, आतां प्रतिनिधि आले म्हणजे त्यांना काय जाब द्यायचा? मला मुद्दाम त्यांनीं एवढ्यासाठीं पुढं पाठविलं. आतां त्यांना काय सांगूं माझं कपाळ! फुकट इतकी यातायात केली. फुकट तुझ्याशीं लग्न लावलं-माझ्या मुळावर आली ही साडेसाती! आतां या घरादारावर नांगर फिरलाच म्हणून समज आणि मलाही हद्दपार करील तो अमात्य राक्षस.

**कनकांगी**—माझ्या मनासारखं होईल हद्दपार झालांत तर!

**भुजंग**—चुप् बैस. आतां प्रतिनिधि येईपर्यंत तुम्हां दोघांनाही येथून हालूं देणार नाहीं. तुम्हीच त्यांना काय तो जाब द्या. तोंपर्यंत तुम्हां दोघांनाही कच्यारीच्या कैचींत धरून ठेवतों.

**घटीशेखर**—तोंपर्यंत मीही दवंडी-काव्य तयार करून ठेवतों-राजकवीच्या महालांत काय नवल वर्तलें— [भुजंग चाबकाचा फटकारा मारतो. पडदा.

---

## प्रवेश सहावा

[ स्थळ—दीनबंधूचा बगीचा. तुलसीदास व कला घरांतून बाहेर येतात.]

कलावती—महाराज, आपण केवढं अरिष्ट ओढवून घेतलं होतं याची कांहीं कल्पना तरी आहे का ? काळाच्या दाढेतूनच आपली परमेश्वरानं सुटका केली म्हणायची.

तुलसीदास—वेडे, परमेश्वर प्रेमाचा वाली आहे. माझी मृत्युमुखांतून सुटका केली, त्याप्रमाणं प्रतिनिधीच्या पकडींतून त्यानं तुझीही सुटका केली नाहीं का ?

कलावती—माझी सुटका ? महाराज, आपल्यापुढं माझ्या सुटकेचं काय महत्त्व ? इकडं येतेवेळीं नको म्हणून मीं मुद्दाम आपल्याला प्रार्थना केली असतांना, या यमाच्या दरबारांत आपण पाऊल कां टाकलं बरं ?

तुलसीदास—वाः ! मी म्हणत होतों तें कांहीं खोटं नाहीं. तुम्हा स्त्रियांची भाषा एक असते, भाव दुसरा असतो आणि कृति तिसरीच दिसते. न येण्याविषयीं तू मला निक्षून सांगून गेलीस खरी; पण इथं येऊन पाहतों तों काय प्रकार दिसला ?

कलावती—काय प्रकार दिसला ?

तुलसीदास—तुझ्या महालांत इतक्या रात्रीं दिवा जळतो आहे; आणि मीं गुप्तपणें वर चढून यावं म्हणून मुद्दाम खिडकीलगत दोरीसुद्धां बांधून ठेवलेली !

कलावती—काय ? खिडकीजवळ दोरी बांधलेली ? छेः ! मुळींच नाहीं. आपल्या भेटीकरतां मी कितीही आतुर असलें तरी कुलांगनेला न शोभणाऱ्या मार्गानं मी कधींही जाणार नाहीं. आणि मग आपल्याला तरी माझ्याविषयीं काय आदर वाटेल ? नाथ ! असला भलताच आरोप विनोदानं देखील माझ्यावर नाहीं करायचा. आपल्या या बोलण्यानें मला आधींच मेल्यापेक्षांही पलीकडे होऊन गेलं आहे.

तुलसीदास—काय दोरी तूं नाहीं बांधलीस–पण प्रत्यक्षाला दुसरं प्रमाण पाहिजे कशाला ? ही पहा दोरी !

कलावती—( निरखून, दचकते ) अगबाई, काय, ही दोरी ? आणि या

दोरीच्या आधारानं आपण वर चढून आलांत? माझ्या सौभाग्याची दोरी बळकट खरी!

तुलसीदास—म्हणजे?

कलावती--महाराज, ही दोरी नव्हे-हा भयंकर काळसर्प आहे!

तुलसीदास—(पाहून) खरंच प्रचंड नाग आहे हा! अहाहा! आज माझं जीवित सार्थ झालं! देहभाव देखील नष्ट करणाऱ्या माझ्या कलेवरील प्रेमाच्या प्रभावामुळं, प्रत्यक्ष कृतांतालाही पादाक्रांत करण्याचं दैवी सामर्थ्य आज मला प्राप्त झालं! मी धन्य झालों!

कलावती--स्वतःच्या अंगीं असलेल्या दैवी सामर्थ्याची ओळख पटायला असल्या स्त्री-विषयक प्रेमाची गरज पडावी, ही केवढी अधोगती! दगडाला देखील देवपणा आणणारा दिव्य ग्रंथ निर्माण करणारी ज्यांची प्रतिभा, त्या महात्म्याच्या अंगीं दैवी सामर्थ्य नाहीं असं कोण म्हणेल? महाराज, हा स्त्रैण-पणा आपल्या अंगीं कोठून आला?

तुलसीदास—हा स्त्रैणपणा नव्हे, ही अधोगति नाहीं,-हा प्रेममहिमा आहे! हेंच माझं काव्य, हाच माझा योग आणि हाच माझा मोक्ष.

[ तिला जवळ घेऊं पाहतो, ती दूर होते.

कलावती—नाथ, जन्मांतरीं केलेला पुण्यसंचय, आज या अलौकिक पतिप्रेमाच्या रूपानं माझ्या फळाला आला खरा. सुखातिशयामुळं मन सद्गदित होतं आणि अशा प्रकारचा प्रेमास्वाद जगांतील प्रत्येक पत्नीला तिच्या पतीपासून लाभावा, एवढंच प्रभु सीतारामचरणीं मागणं मागावंसं एक वेळ वाटतं. पण पुरुषांची मोहसुलभ वृत्ति जर केवळ स्त्रीप्रेमांत सर्वस्वी विलीन झाली तर पुरुषजातीच्या अधोगतीचं पातक अखिल स्त्रीजातीला लागेल. माझा तसा अधिकार नाहीं; पण या वेळीं बोलल्यावांचून राहवत नाहीं. रक्तमांसादि दुर्गंधीच्या चिखलानं लिंपलेला हा हाडाचा सांगाडा तात्पुरत्या चकाकणाऱ्या बेगडी त्वचेनं मढवलेला हा डोलारा-या डोलाऱ्याच्या लालसेनं आपण स्वतःचं भान विसरलांत आणि विषयप्रेमाशीं तद्रूप झालांत याला काय म्हणावं?—

२९. पद

वाया हा नरदेह दवडिलां। स्त्रीलंपट अंध मढ बनलां ॥ ध्रु० ॥ भुजगखंड रज्जुखंड गमला, करिं धरिलां। भेद-भाव नुरला ॥१॥ अंगनांग आलिंगनीं सजलां. परि मुकलां। रघुवरपदकमलां ॥२॥ रामपदीं हार्दि भाव जडतां, उद्धरितां। आपणां सकलां ॥ ३ ॥

महाराज, मोहाचं पर्यवसान योगांत होणं हेंच खरं कविहृदय नव्हे का?

तुलसीदास—मोहाचं पटल दूर करणारी माझी गुरुदेवता तूंच. प्रत्यक्ष प्रभु रामचंद्राच्या स्वरूपांत मी तुला पाहतों आहें. ( नमस्कार करून जाऊं लागतो )

कलावती—हें क्षणिक वैराग्य आहे-पैलतीरीं जाऊन लवकर आश्रम गांठला पाहिजे. [ त्याच्या मागोमाग जाते.

पडदा

## अंक दुसरा समाप्त

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

[ कवि भुजंगाचें घर-चोपदार व घटीशास्त्री प्रवेश करतात.]

घटीशेखर—हेंच त्यांचं घर-मारा थाप. ( स्वगत ) आतां आपण आडून मौज पहावी !

चोपदार—( दारावर थाप देऊन ) दीनबंधु पाठकांचे जांवई इथंच राहतात काय? अहो जांवईबोवा-अहो कविराज-अहो राजकवि—

भुजंग—( बाहेर येतो ) कोण आहे ? ( स्वगत ) हें काय अरिष्ट आलं आज !

चोपदार—हुजूरनीं तुम्हांला हजर व्हायचा हुकूम केला आहे.

भुजंग—कोण हुजूर बोवा?

चोपदार—मी कोणाचा चोपदार आहें माहीत नाहीं का? त्या दिवशीं बगीचांत भेटलों होतों-आठवत नाहीं ?

भुजंग—हां हां! म्हणजे बगीचांत त्या चिताऱ्याचा पोरानं तुम्हांला चीत करून, तुमच्या छातीवर बसून—

चोपदार—तें नाहीं तुम्हांला विचारलं. अमात्यांनीं तुम्हांला हजर व्हायला सांगितलं आहे.

भुजंग—मला हजर व्हायला सांगितलं आहे ? अहो, तुमचा कांहींतरी भलताच समज झाला आहे-अमात्यांकडे माझं हो काय काम? दुसऱ्या कोणाला तरी बोलावलं असेल!

चोपदार—अहो नाहीं. दीनबंधूच्या जांवयाला घेऊन, या म्हणून हुकूम झाला आहे.

भुजंग—बरोबर आहे. तर मग तुलसीदासाला घेऊन जा. तोही दीनबंधूचा जांवई आहे.

चोपदार—अहो, तसं नाहीं-तुम्हांला-राजकवीला घेऊन या म्हणून हुकूम झाला आहे.

भुजंग—काय राजकवीला ! खुद्द अमात्यसाहेबांच्या तोंडचे हे शब्द ?

चोपदार—होय, खुद्द हुजूरच्या तोंडचे—

भुजंग—तर मग माझा राजकवीचा हुद्दा मला पुन्हा मिळाला ! आनंद! आनंद ! त्यांनींच मला बडतर्फ केलं आणि त्यांनींच मला पुन्हा अन्नाला लावलं म्हणायचं ! काय हें कनवाळू अंतःकरण ! तुम्हांला या वेळीं इनाम द्यायला मजजवळ कांहीं नाहीं, याचं फार वाईट वाटतं. आतांच बोलावलं आहे का?

चोपदार—आणखी अर्ध्या घटकेनं हजर व्हायचा हुकूम आहे. जर नाहीं आलांत तर मुसक्या बांधून नेण्यांत येईल. ध्यानांत ठेवा.

भुजंग—हा पदवीदान-समारंभ कांहीं निराळाच दिसतो आहे ! (प्रगट) मीं अगदीं वेळेवर हुजूरच्या सेवेस हजर आहें.

चोपदार—नाहीं आलां तर याद राखून ठेवा. मी जातो. [जातो.

भुजंग—अमात्याचं बोलावणं म्हणजे यमराजाचं पाचारण ! पूर्वीं या स्वारीच्या भेटीकरतां मीच पुढं पुढं करीत होतो आणि आतां मलाच पुढं घालून नेण्याकरितां हे यमाचे दूत पाठी लागले आहेत. त्या दिवशीं तुलसीदास आणि कलावती आमच्या हातांतून निसटलीं आणि हे अमात्य तेव्हांपासून पिसाळल्यासारखे झाले आहेत. दीनबंधूला अटकेंत ठेवला आहे—मला हद्दपार करतील या भीतीनं मीं या माझ्या जुन्यापुराण्या घरांत तोंड दडविलं, पण इथंही माझा पिच्छा पुरवलाच यांनीं—आतां कुठं तोंड दडवावं बरं ! या वेळीं घटीशास्त्री असता म्हणजे त्याच्या घरांत तरी दडून राहिलों असतों. पण हा खुंटावरचा मुंजा सांपडणार कसा ?

घटीशेखर—( पुढें येऊन ) नमस्कार कविराज !

भुजंग—घटीशास्त्री, तुला शंभर वर्षं आयुष्य आहे ! तूं भेटलास हा मोठा शुभशकुन झाला बोवा.

घटीशेखर—त्या दिवशीं मला दुर्जन म्हणालांत आणि माझ्या दर्शनानं आज शुभ शकुन झाला काय ? कवि आहांत खरे !

भुजंग—अरे, मला कवि म्हणूं नकोस, राजकवि म्हणत जा.

घटीशेखर—पण तुम्हांला राजकवीच्या हुद्दयावरून बडतर्फ केलं आहे.

त्या दिवशीं दीनबंधूच्या घरीं माझ्या पाठीचीं सालडीं तुम्हीं काढलींत आणि तुमचीं चामडीं लोळविलीं अमात्यांनीं !

भुजंग—पण आतांच अमात्यांचा चोपदार आला होता माझ्याकडे; त्यानं हुजूरचा काय निरोप आणला माहीत आहे तुला ? " राजकवि दीनबंधूचे जामात कवि भुजंग यांना भेटण्याची माझी इच्छा आहे, तेव्हां एक घटकेनं येण्याची ते कृपा करतील—"

घटीशेखर—हो हो, तें मीं सर्व समक्ष ऐकलंच. मी इथंच पलीकडे होतों. नाहीं आला तर मुसक्या बांधून नेण्याचा सन्मान होणार ! केवढा आपला गौरव होणार !-मी गांवभर केवढी दवंडी देणार !

भुजंग—कांहीं तरी थाप मारतो आहेस झालं-तू इथं कुठं होतास ?

घटीशेखर—अहो, मींच त्या चोपदाराला तुमचं घर दाखविलं, आणि जरा बाजूला झालों. म्हटलं राजकारणांत आपण कशाला पडा—

भुजंग—तूंच घर दाखविलंस का ? मोठा परोपकारीच आहेस. आतां मला या वेळीं तुझं घर दाखव हें पहा. त्याचं असें झालं आहे—

[ एकीकडे मागल्या बाजूस कुजबुजतात. घटीशास्त्र्याची बायको शरयू फळांची टोपली घेऊन येते. येतां येतां ठेंच लागून त्यांतील फळें पडतात. तीं वेंचूं लागते ]

शरयू—बाई, बाई, बाई ! डोकींत कळ गेली ग बाई ! धर्म करायलां जावं तर कर्म उभं राहातं. यांची धिंडका कुठं कुटाळांचे अड्डे पुजायला गेली आहे कुणास ठाऊक ? सटीसणावारी एखाद्या दवंडीचं काम येतं. उद्योग ना धंदा; खाद खायला तरी वेळेवर यावं कीं नाहीं, पण तेंही नाहीं. तेवढ्यांत नदी-पलीकडे जाऊन तुलसीदास महाराजांच्या पोथीपुढं एवढीं फळं ठेवून यावं म्हणून लगबगीनं निघाले, तों कांहींतरी विघ्न आडवं आलंच. ( फळें वेचूं लागते.)

घटीशेखर—ऑं ! ही कोण आंबेवाली, आणि इथं घोटाळते आहे कशासाठीं ?

भुजंग—तेव्हां मला तुझ्या घरीं घेऊन चल म्हणजे—

घटीशेखर—माझी गृहदेवता दोघांचीही जळक्या लांकडानंच पूजा करील ? पण ही कोण इथं ? माल बरा दिसतो ! तुमच्याकडेच आली आहे वाटतं सौदा ठरवायला ! तरीच तुमच्या दरवाज्यापुढं घोटाळते आहे !

भुजंग—काय भलतंच बोलतोस हें ! कोणी तरी असेल बिचारी !

घटीशेखर—बिचारी ! आहा ! काय माया आली हो तुम्हांला बिचारीची ! मी तुमच्याजवळ आहें हें पाहूनच हे आंबे वेचण्याचं निमित्त, नाहीं तर सरळ रस्त्यावर ठेचाळतं वाटतं कोणी ? अहो, बायका म्हणजे महावस्ताद ! बाकी नशीबवान आहांत बोवा !

भुजंग—अरे, तुझी शपथ मला यांतलं कांहीं माहीत नाहीं !

घटीशेखर—होय का ? बरं, पाहूंया आतां. ( खाकरतो. )

शरयू—कोण मेला खाकरतो आहे. बायको बघितली कीं रस्त्यांतल्या टवाळांचा घसा खवखवायला लागतो जसा. जणुंकाय दमेकऱ्यावर बायका भाळतात असं वाटतं मेल्यांना ! काय तरी यांची अक्कल !

घटीशेखर—( खाकरतो व खरडून आवाज काढतो. ) जरा हात लावूं का मी—

शरयू—( स्वगत ) मेल्याच्या घशांत पहार घातली आहे कुणी ? ( प्रगट ) कोणाला रे मेल्या हात लावतोस ? ( पाहून ) अगबाई ! तुम्हीं का ?—चांगली धंदा करतां बरं !

घटीशेखर—अरे बाप रे ! तूं का ? चांगला धंदा करतेस बरं !

शरयू—तुमच्यासारखा पांचटपणा करीत रस्त्यांतून हिंडत नाहीं मी !

घटीशेखर—मुळींच नाहीं, आंबे, संत्रीं, नारिंगं घेऊन सरळ कविराजाच्या घरांत घुसतेस. आंबरस कुठें पांचट असतो का ? मी पांचट ! काय करूं, माझ्या हातांत या वेळीं चाबूक असता तर कविराज, तुमच्या अंगाची चांगली चामडी लोळवून त्या दिवशींचा सूड उगवला असता—पण, कांय करूं रे !

भुजंग—छान दांत पडले ! म्हणे " नशीबवान आहांत बोवा ! "

घटीशेखर—कुठं निघालीस बोल-आंबे घेऊन ? खरं बोल.

शरयू—खरं बोलायला कोणाची भीति आहे कीं काय मला ? मी तुळसीदासमहाराजांच्या दर्शनाला जातें आहें.

घटिशेखर—टोपलीभर फळं ओतून दर्शन घ्यायचं असतं नव्हे का ? तुलसीदास झाला तरी कविच कीं नाहीं ? हा कवि नाहीं तर तो कवि. या या कवींची ब्याद माझ्या बोकांडीं बसली आहे, ती कांहीं सुटत नाहीं. आणि

नमस्कार करतांना चिठ्ठीचपाटी, पायाला खुणेचा चिमटा नाहीं का घेत ? म्हणे महाराजांचं दर्शन ! हे महाराज बरे बोकाळले आहेत अलीकडे–बोकेसंन्यासी बदमाष कुठले !

शरयू—जीभ झडून जाईल तुलसीदासासंबंधानं असलं कांहीं भलतंसलतं बोलाल तर. स्वतःच्या हातून मुंगीएवढं पुण्य घडायचं नाहीं, आणि दुसऱ्याच्या वाटेंत मात्र हत्तीएवढा धोंडा होऊन अडथळा करायचा.

घटीशेखर—खरं आहे, पण याच धोंड्यांवर पाय देऊन तुझे तुलसीदास-महाराज, यांच्या—दुसऱ्याच्या बायकोच्या खोलींत घुसले होते–

भुजंग—हां खबरदार, तोंड फोडीन, माझ्या बायकोचं नांव घेशील तर.

घटीशेखर—आणि असल्या माणसापुढं तूं आंबे ठेवायला निघाली आहेस ?

शरयू—मला त्या माणसाशीं काय करायचं आहे ? मी हीं फळें त्यांच्या पोथीपुढं ठेऊन नमस्कार करून येणार.

भुजंग—कसली पोथी ? हा तुलसीदास पोथ्यापुराणं केव्हांपासून सांगूं लागला ? वाः रे सुंदर पुराणीक !

शरयू—अहो, त्या महात्म्याविषयीं असं बोलूं नका–नरकांत पडाल. रामायणाची कथा नित्य नवी रचून शेंकडों भक्तांच्या पुढें जे आज कितीएक महिने वाचून दाखवीत आहेत, त्यांना यःकश्चित् पुराणीक म्हणूं नका. आतां उद्यां रामनवमी आहे; उद्यां संपूर्ण रामायण प्रगट होणार, आणि रामजन्मानंतर अथपासून इतीपर्यंत त्याचं परायण होणार. आतां शेवटचा थोडा कथाभाग शिल्लक राहिला आहे, तो महाराज आज लिहून पुरा करणारच. असल्या कवीची काय थोरवी सांगावी ?

भुजंग—बरें बाई, तुम्हीं ऐकलं आहे का त्यांतलं कांहीं पुराण ?

शरयू—यांच्या त्रासांतून फुरसत मिळाली तर जातें केव्हां केव्हां ऐकायला. डोळे नकांत कांहीं फाडायला-मी कांहीं तुमच्या डोळ्यांत मावायची नाहीं; आणि मी कांहीं एकटीच जात नाहीं, गांवांतल्या शेंकडों बायका दररोज नेमानं जात असतात.

भुजंग—बरं, काय आहे असं त्या रामायणांत तें तरी सांगा, म्हणजे आम्हीही जाऊं ऐकायला.

शरयू—आणि यांनाही घेऊन जा–म्हणजे कांहीं तरी पुण्य पदरीं पडेल. नाहींतर रामाची सीता कोण हें सुद्धां माहीत नसायचं.

घटीशेखर—आणि रावणाची मंदोदरी कोण हें तूं तरी सांगशील का ?

शरयू—मी तुमची कोण तीच रावणाची मंदोदरी.

घटीशेखर—म्हणजे तू साध्वी मंदोदरी आणि मी रावण काय ?

शरयू—हो यांत काय संशय ? रामभक्तांचा द्वेष करणारे तुम्ही रावणच नाहींतर काय !

घटीशेखर—बरं आहे. पाहून घेईन—

भुजंग—रामायणांतील कोणता कोणता कथाभाग ऐकलात तो तरी सांगा.

शरयू—सीतास्वयंवर ऐकलं, भरतभेट, मायामृग, वालीवध, लंकादहन–अन् काय काय तरी ऐकलं. तुलसीदासमहाराजांच्या रसाळ वाणींतूनच तें ऐकलं पाहिजे; ऐकतांना श्रीरामचरित्र डोळ्यासमोर पाहिल्यासारखं वाटतं ! उद्या जरूर ऐका.

भुजंग—बस्स, आलं ध्यानांत ! अरे मित्रा, हें सारं रामायण तुलसीदासानं माझ्या पोथींतून चोरलें आहे–म्हणे रामायण रचतो आहे ! त्याची काय किंमत ?

शरयू—म्हणजे, आपणही स्वतः रामायण लिहिलं आहे कीं काय ? ( त्याला नमस्कार करिते.)

भुजंग—माझी स्वतःची वाल्मीकिरामायणाची पोथी होती, ती तुलसीदासाला मींच दिली होती. ती पोथी माझी आहे ! त्यांत तुम्हीं सांगितलेल्या साऱ्या गोष्टी आहेत–राम आहे, सीता आहे, रावण आहे, मंदोदरी आहे, वाली, मारुती, भरीत सगळं आहे.

घटीशेखर—भरताचं वांग केलंत अगदीं ! पुराणांतलं वांगं तें हेंच वाटतं ?

भुजंग—तुलसीदासाचं सगळं बिंग बाहेर फोडतों; ऐन रामनवमीच्या दिवशीं, सर्व लोकांसमक्ष, त्याच्या भक्तमंडळासमोर त्याच्या नाकावर टिचून हें त्याचं रामायण माझ्या पोथीवरून चोरलं आहे असें जगजाहीर करतों.

घटीशेखर—तें काम माझं ! अशी दणदणीत दवंडी देतों–पण काय हो तुमच्या पोथींत आणि तुलसीरामायणांत कोठेंच कांहीं मेळ नसला तर तो तुमची पोथी पुढं काढील आणि लोक उलट तुमची छीः थूः करतील त्याची वाट काय ?

भुजंग—पोथी पुढं काढण्याची काय माय व्याली आहे! काढ म्हणावं ती पोथी पुढं–ती पोथी केंव्हांच माझ्या हातीं लागली आहे–तिचा मागमूससुद्धां मीं नाहींसा करून टाकला आहे–मी असं कच्चं काम करीत नसतों.

घटीशेखर—असं आहे का? मग मी आजपासूनच दवंडी द्यायला सुरवात करतों कीं, तुलसीरामायण हें कविभुजंगग्रथित आणि वाल्मीकिप्रणीत रामायण आहे.

भुजंग—वाल्मीकीचं नांव मधें कशाला? पोथी माझी आहे. माझ्या पोथीवरूनच त्यानं आपलं रामायण लिहिलं–म्हणजे माझ्या रामायणावरून लिहिलं अशी तूर्त दवंडी दे–पाहूं यावर तुलसीदास काय करतो तें. बरं, मी जरा अमात्यांकडे जाऊन येतों. [ जातो.

शरयू—तुमच्या या मत्सरी स्वभावाकडे पाहून महाराज हंसतील मात्र. 'हाती चाले अपने चालसे'–माहीत आहे ना? तुमच्यासारख्या निंदकांच्या सावलीलासुद्धां उभं राहूं नये कोणीं. जावंच इथून.

घटीशेखर—चाललीस कुठं? ते आंबे-केळीं–नारिंगं ठेव इथं.

शरयू—अहो, पोथीपुढं ठेवायचे पदार्थ असे वाटेंत लुटूं नयेत. पुण्य-कृत्याच्या आड येणं बरं नव्हे; तुम्हांलाही यांतलं अर्धं पुण्य मिळणार आहे!

घटीशेखर—मला अर्धं पुण्य नको आहे–सगळे आंबे पाहिजे आहेत.

शरयू—देत नाहीं–काय कराल माझं?

घटीशेखर—काय करीन–दवंडी देईन!

शरयू—कसली दवंडी द्याल?

घटीशेखर—कसली दवंडी सांगूं का? माझी बायको बदफैली आहे म्हणून. दवंडीबहादुराची अर्धांगी आंबेवालीच्या वेषांत आणि शिरली राज-कवीच्या गोपांत! अशी दवंडी देईन.

शरयू—जीभ झडून पडेल अशानं. लाजलज्जा सगळीच कशी गुंडाळून ठेवलीत. अहो, पण यांत तुमचाच बदलौकिक होईल याची कांहीं खंत?

घटीशेखर—यात माझा कसला आला आहे बदलौकिक? तुझाच बद-लौकिक! माझ्या धंद्यापुढं बायको, आई, बाप, बहीण असलीं अडचणीचीं नातीं मी मुळींच जुमानीत नसतों. आंबे आण नाहींतर सुरू करतों दवंडी.

शरयू—घ्या एकदां–आणि तोंड बंद करा. असले आंबे खाण्यापेक्षां दगड कां नाहीं पोटांत भरत? [ जाते.

घटीशेखर—या ब्रह्मास्त्रापुढें सारे नरम पडतात ! ( फळें खात बाजूला बसतो.)

[ अमात्य जटाशंकर व दोन शिपाई दुसऱ्या बाजूनें प्रवेश करितात.]

जटाशंकर—(शिपायांस) मी काय सांगतों तें नीट ध्यानांत ठेवा. ऐन मध्यरात्रीचे सुमारास कोणालाही चाहूल न लागतां तुम्ही दोघेही नदीकिनाऱ्यावर जा. तुमच्या करितां तेथें नाव तयार असेल. " रामनवमी " असा परवल सांगा आणि त्या नावेंतून नदीपलीकडे जा. आम्ही सर्व मंडळी कांहीं वेळानं तुमच्यामागून दुसऱ्या नावेंतून येतों. तुमच्याकडे कामगिरी एवढीच कीं—

पहिला शिपाई—हुजूर, मध्यरात्रीं नावेंतून नदी ओलांडायची म्हणजे काय एवढीशी कामगिरी झाली ?

दुसरा शिपाई—पण हुजूर करितां आपण तीही करूं !

जटाशंकर—पागल आहांत. अजून कामगिरी ती पुढंच आहे; नीट ऐका. नदीपलीकडे गेल्याबरोबर तुलसीदासाच्या आश्रमांत शिरून त्याला अचानक पकडायचा आणि त्याच्या मुसक्या बांधून तोंडांत बोळा घालून त्याला दूर कुठें तरी अटकेंत ठेवायचा, हें तुमचं काम बाकीचं काम आमचं आम्ही पाहून घेऊं. जर या कामांत कसूर झाली तर तुम्हां सर्वांना तोफेच्या तोंडीं देईन.

पहिला शिपाई—हुजूर आपण असतांना आम्हांला तोफेच्या तोंडाची काय भीति ? आमच्याकडून केव्हांही कसूर होणार नाहीं. पण जनाब, हा बदमाष तुलसीदास आम्ही ओळखायचा कसा ? त्याला आम्हीं कधीं पाहिलाही नाहीं, काळा आहे कीं गोरा आहे तो.

दुसरा शिपाई—आमच्याबरोबर कोणीतरी त्याला दाखवून देणारा माणूस हुजूरनीं दिला, तर आम्ही ताबडतोब तुलसीदासाला बिनचूक ओळखूं.

जटाशंकर—वः मोठी शिताफी आहे तुम्हां लोकांची ! माणूसबिणूस कोणी मिळणार नाहीं. या कामाची तिसऱ्या माणसाला दखलगिरी मिळतां कामा नये. मी तुलसीदासाची तुम्हांला एक मोठी खूण सांगतों तो सारखा रामराम जपत असतोः बडा ढोंगी बदमाष आहे; झोंपेंतूनसुद्धां रामराम करीत उठतो ! त्यानं एक रामायणाचं पुराण लिहिलं आहे, आणि त्यांत आपल्या खुदावंत बादशाहाची मोठी बेइज्जत केली आहे; आणि म्हणूनच त्याला बादशाहाच्या हुकुमावरून गिरफदार करायचं आहे. तुम्हीं ही कामगिरी केलीत तर

तुमच्यावर बादशहाची मर्जी बहाल होईल, आणि या कामगिरीबद्दल तुमची एकदम बढतीही होईल.

पहिला शिपाई—तर मग हुजूरनीं अगदीं बिनधोक रहावं. आम्ही आमचे प्राण देऊं, पण बादशाहाची बेदिली करणाऱ्याला राम म्हणायला लावूं. राम राम कहनेवाला हरामजादा–रामायण लिहितो आहे म्हणे !

दुसरा शिपाई—त्याच्या मुसक्या नाहीं बांधल्या तर ही दाढी-मिशी उतरून देईन ! हुजूरनीं अगदीं बेफिकीर असावं; पण त्याच्या मकानांत कोणी कमीजास्त लोक असले तर—

जटाशंकर— मध्यरात्रीं तिथं कोण येणार मरायला ! पुरें झालं, जा तुम्ही. पुन्हा आतां मला भेटायला येऊं नका. बरोबर मध्यरात्रीला घाटावर नाव तयार राहील. मी या बाजूनं जातों, तुम्ही त्या बाजूनं जा. [ जातो.

पहिला शिपाई—भय्या, आतां तुझ्या दाढी-मिशांची इज्जत राखायची युक्ति सांगूं तुला ? एकतर त्यांना आतांच आजबात छाट दे, म्हणजे असल्या अडचणीच्या वेळीं इज्जत राखायची कटकट कायमची मिटेल. नाहींतर तुलसी-दासाला ओळखणारा कोणी तरी इथला इसम आपण बरोबर घेऊन जाऊं, म्हणजे आपलं काम साधेल. शिवाय तेवढाच एखादा माणूस जास्त असलेला आपल्याला बरा. नाहीं तर भलत्याच माणसाला गिरफदार करून आपल्यावर-च आफत यायची आणि मग प्रतिनिधिसाहेब आम्हांला चांगले लंबे करून आमची बढती करायचे !

दुसरा शिपाई—पण तुलसीदासाला दाखवून देणारा इसम आम्हांला मिळणार कसा ? शिवाय नदीपलीकडे जायचं म्हणजे मोठी आफत आहे बुवा. या बदमाष तुलसीदासानं पलीकडच्या राज्यांतून हद्दपार होऊन या हद्दीत आश्रम बांधला असता तर काय बिघडलं असतं ?

पहिला शिपाई—हे गुन्हेगार बदमाष बडे बेपर्वा असतात. वाटेल ते गुन्हे करावेत पण त्यांत सरकारी नोकरांची थोडी सोय बघावी. हरामखोर जात !

दुसरा शिपाई—तें झालं; पण तुलसीदासाला दाखवून देणारा परोपकारी इसम मिळणार कुठं ? मोठी पंचाईत झाली ही ! आणि रात्रीच्या पिशाच्चवेळीं नदीपलीकडे यायला कोण सैतान मिळणार ?

**घटीशेखर**—( एकदम पुढें होऊन ) अहो, मी आहें हजर तुलसीदासाला दाखवून द्यायला. तुम्ही कां काळजी करतां !

**पहिला शिपाई**—वा दोस्त, फार चांगल्या वेळेला भेटलां बुवा. आमचं एवढं काम केलंत तर आम्ही तुम्हांला खूष करूं. ( कानांत सांगतो.)

**घटीशेखर**—( स्वगत ) याला म्हणावं नशिबाचा तारा ! आतां या राजकवीची चांगलीच रेवडी उडवतों—माझ्या बायकोशीं सूत जमवूं पहातो आहे. पाहून घेतों.

**दुसरा शिपाई**—कां, विचार कसला करतां ? माझ्या दाढीमिशांची इज्जत आतां तुम्हींच राखली पाहिजे. तूर्त हा घ्या तुम्हांला बयाणा ( त्याला द्रव्य देतो.) आतां तरी आमचा विश्वास पटला ? आम्ही सरकारी नोकर आहोंत.

**घटीशेखर**—अहो, खरं म्हटलं तर सरकारी नोकरींवर किंवा सरकारी नोकरावर शाहाण्यानं कधीं विश्वास टेवूं नये. सकाळीं सौभाग्यवती आणि रात्रीं गंगा-भागीरथी ! मी आपला सच्चा, सरळ, स्पष्ट बोलणारा माणूस आहे; रागावूं नका. मला दोहोंचाही चांगला अनुभव आहे; तुमची गोष्ट निराळी आहे म्हणा ! मी तुम्हांला आतां सांगतों एक गुपित. अहो, या तुळसीदासाला पकडायला नदीपलीकडे जायला नको. रात्र पडली कीं, दररोज चोरून या शहरांत तो येत असतो—बडा बदमाष आहे. हेंच त्याचं घर. आतां इतक्यांत येईल तो. मी मुद्दाम त्याच्या पाळतीवर राहिलों आहें. तुम्ही कांहीं वेळ इथं पलीकडे दबा धरून बसा आणि मी रामराम म्हणून टाळ्या वाजविल्या, कीं पुढं येऊन त्याला पकडा.

**पहिला शिपाई**—अरे भय्या, अमात्यसाहेबांनीं तर आम्हांला नदीपलीकडे जाऊन त्याला पकडायला हुकूम केला आहे. मग आम्ही त्याला इथं कसं पकडायचं ? आपण हुकमाचे ताबेदार; हुकमाच्याबाहेर नाहीं वागणार.

**घटीशेखर**—अहो, नदीपलीकडे जाऊन पकडणं काय, आणि इथं पकडून त्याला नदीपलीकडे घेऊन जाणं काय, दोन्ही एकच ! त्याच्या मुसक्या बांधून ठेवण्याशीं तुमचं काम. प्रतिनिधि कुठें पाहायला येतात ?

**दुसरा शिपाई**—तसं नाहीं. मुसक्या बांधून त्याला प्रतिनिधींच्या पुढें उभा केला नाहीं, तर आमची कामगिरी त्यांच्या नजरेला कशी येणार ? आणि त्यावांचून आम्हांला बढती मिळणार कशी ? पण काय हो, तुम्ही

म्हणतां तो रामराम म्हणणारा, रामायण लिहिणाराच अस्सल तुलसीदास आहे ना !

घटीशेखर—तुम्ही प्रत्यक्षच खात्री करून घ्या म्हणजे झालं. बयाणीं घेऊन गिऱ्हाइकाला फसवायचा माझा धंदा नाहीं. हं, चला त्या भिंतीआड छपून बसा. आपलं सावज आलंच.

दुसरा शिपाई—बहोत ठीक. कोणी येत आहे खरं इकडे. वा दोस्त, माझ्या दाढीमिशांची इज्जत—

घटीशेखर—तुम्ही आधीं जा इथून. ( स्वगत ) कविराज, या असे मैदानांत! तुमच्या बायकोच्या महालांत त्या दिवशीं माझी चामडी लोळविलीत त्यांचं प्रायश्चित्त भोगा आतां ! ( फळें खात बसतो.)

भुजंग—( प्रवेश करून ) या जटाशंकरची कांहीं भेट झाली नाहीं. एका अर्थी बरं झालं हें. होय, हल्लींच्या स्थितींत त्या पिसाटाची भेट होऊन तरी काय संभावना होणार होती म्हणा. असो, निरोपाप्रमाणं तिकडून जाऊन आलों. आपल्यावर आतां शब्द राहिला नाहीं. सुटलों म्हणायचा शिरसलामत ! अरे, कोण घटिशास्त्री ? तूं अजून इथेंच आंबे खात बसला आहेस ?

घटीशेखर—अहो, आंबे खायचे तर ते शांतपणानं बसून खावेत. आंबे खाण्याचा हा एकच राजमान्य रस्ता आहे. मघांच्या आंबेवालीनं जसा तुमच्या घरचा राजमान्य मार्ग धरला होता त्याचप्रमाणं—

भुजंग—राम ! राम ! अजून तुझ्या डोकींतून ती आंबेवाली गेली नाहीं का ? अरे तुझी बायको ना ती ?

घटीशेखर—राम राम राम. तुमच्या तोंडाला अक्षय्य रामनामाचा चाळा आहे तो ठीक आहे. वाः तुलसीदास ! तरीच तुमच्या रामायणाच्या पोथीपुढें आंबे ठेवायला माझी बायको आली होती वाटतं ?

भुजंग – राम राम राम काय बोलतोस हें ! अरे मित्रा, पण माझ्या रामायणाची दवंडी द्यायची सोडून ही भलतीच चर्चा काय चालविली आहेस ? मघांशीं काय ठरलं होतं ?

घटीशेखर—मग काय, देऊं दवंडी रामायण तुम्हीं लिहिलं म्हणून ?

भुजंग—बेलाशक दवंडी दे. कुणाची भीति आहे ? मी रामायण लिहिलें आहे, मी तुलसीदास आहें—सवाई तुलसीदास आहें.

**घटीशेखर**—राम ! राम ! राम !—( टाळी वाजवितो )

**पहिला शिपाई**—( पुढें येऊन ) काय, रामायण आपण लिहिलंत ?

**भुजंग**—हो, मीं लिहिलं रामायण. मी सवाई तुलसीदास आहें. दुसरा कोणी रामायण लिहिणारा असेल, तर तो तोतया, लुच्चा तुलसीदास आहे.

**घटीशेखर**—जमादारसाहेब, मी सांगत होतों ते हेंच बरं, रामायणाचे कर्ते—खरे तुलसीदास !

**दुसरा शिपाई**—पकडा हरामखोराला, बांधा मुसक्या बदमाषाच्या !

**भुजंग**—अरे राम रे, ही काय पिडा माझ्यामागं ! अहो, पण माझं म्हणणं तरी ऐकून घ्या—

**पहिला शिपाई**—जास्त बडबड करतोस ! अरे याच्या तोंडांत बोळा घाला.

**भुजंग**—अहो, पण माझा अन्याय तरी काय ?

**दुसरा शिपाई**—रामाच्या नांवावर विकणाऱ्याला गिरफदार करण्याचा बादशहाचा हुकूम आहे.

**भुजंग**—प्रभो रामचंद्रा !

**पहिला शिपाई**—हरामखोर पुन्हा रामाचं नांव ! ( त्याला बांधतात. )

**घटीशेखर**—कविराज तुलसीदास, भोगा आपल्या काव्याचं प्रायश्चित्त ! म्हणे. "एकादी तरी रमणी काव्यप्रबंधांत बद्ध केली नाहीं, तर तो कवि कसला !" आतां तुम्हींच बादशहाच्या जेरबंदांत बद्ध झालां आहांत—सवाई तुलसीदासमहाराज !

**पहिला शिपाई**—मग, आजच्या कामगिरीबद्दल आमची सवाई बढती होईल तर !

**घटीशेखर**—सवाई का दिढी होईल ! यांच्यासारख्या दीड शाहण्याला पकडल्याबद्दल ! आतां तुम्ही त्याला असाच नदीपलीकडे घेऊन जा; आणि मध्यरात्रीं ऐन वेळेला अमात्यांपुढं उभा करा म्हणजे झालं.

**दुसरा शिपाई**—भय्या, आतां नदीपलीकडे जायची आफत कशाला ! या बदमाषाला असाच ताबडतोब अमात्यांच्या पुढं हजर करूं या.

**पहिला शिपाई**—हो, असंच करूं या ! गुन्हेगाराला फौरन पकडल्याबद्दल अमात्यसाहेब आमच्यावर निहायत् खुष होतील ! ( घटीशेखरास ) चला

दोस्त आमच्याबरोबर; तुम्हालाही चांगलं इनाम मिळेल! आम्ही तुमची अमात्यसाहेबांपुढें शिफारस करूं.

घटीशेखर—( स्वगत ) हें काय भलतंच लचांड झालं! ( प्रगट ) अहो, तुम्ही सरकारी नोकर हुकुमाचे ताबेदार ना? मग हुकुमाविरुद्ध कसे जातां? हुकुमाप्रमाणें याला नदीपलीकडेच पकडला पाहिजे. त्याशिवाय हाच तुलसीदास अशी अमात्यांची खात्री कशी पटणार!

दुसरा शिपाई—त्यासाठींच तर आम्ही तुम्हाला बरोबर नेणार! तुम्ही साक्ष द्यालच, कीं हाच तो बदमाष तुलसीदास म्हणून.

घटीशेखर—हा बदमाष आहे म्हणून साक्ष देईन; पण हाच तुलसीदास आहे कीं नाहीं याबद्दल खात्री नाहीं—

पहिला शिपाई—काय? आतां भाषा बदलतोस? तुला खेंचून नेऊं अमात्यांपुढं.

घटीशेखर—अहो, माझ्या वांट्याचं इनाम तुम्हीच घ्या—पण मला अमात्यांपुढं नेऊं नका; तुमच्या पायां पडतों.

भुजंग—अहो जमादार, तुम्ही याला सोडूं नका. त्याला बरोबर घेऊन चलाच, म्हणजे सर्वांचेच डोळे उघडतील!

दुसरा शिपाई—इथं कांहींतरी दगाबाजी आहे. याच्याही मुस्क्या बांधल्याच पाहिजेत. ( घटीशेखरला पकडून बांधतात. )

पहिला शिपाई—दोघेही सिद्धसाधक सोदे दिसतात! ( भुजंगाला व घटीशेखरला घेऊन जाऊं लागतात. )

शरयू—( घाईनें प्रवेश करून ) अहो, त्यांना कुठं घेऊन जातां? आणि त्यांनीं केलं आहे तरी काय?

दुसरा शिपाई—बादशहाच्या हुकुमानं या दोघांही बदमाषांना गिरफदार केलं आहे, आणि अमात्यसाहेबांपुढं यांना हजर करायचं आहे.

शरयू—अहो, पण त्यांचा अन्याय तरी काय?

पहिला शिपाई—बाई, उगीच आमचा वेळ घेऊं नकोस. सरकारी शिपाई बायकांबरोबर भांडत नसतात. तुम्हाला काय सांगायचं असेल तर उद्यां अमात्यसाहेबांना दिल्लींत येऊन भेटा. अमात्यसाहेबांना बायकांचा भारी कळवळा येतो. [ जातात.

शरयू—(स्वगत) या शेदाड शिपायांच्या तोंडाला लागून फायदा नाहीं. आतां असंच यांच्या मागोमाग जावं आणि अमात्यांपुढं काय प्रकार होईल त्याप्रमाणं पुढील विचार ठरवावा. देवा, माझ्या खुळ्या धन्याला या संकटांतून सोडीव. [जाते.

---

## प्रवेश दुसरा

[स्थळ—दीनबंधूचे घरांतील दिवाणखाना. दीनबंधु व जटाशंकर बोलत येतात.]

दीनबंधु—हुजूर, नदीकांठीं नावा तयार आहेत. आपले सर्व लोकही घाटावर बसवून ठेविले आहेत. फक्त तुलसीदासाचा बंदोबस्त करायला पुढं कोणी जायचं त्या बाबद हुकूम व्हावा.

जटाशंकर—ती सर्व तजवीज मीं केली आहे; त्याची तुम्हांला काळजी नको. तुम्ही जा आणि ताबडतोब तहशीलदाराला बोलावून आणा. परत दिल्लीला रात्रींच कुच करायचं आहे; तेव्हां त्यासंबंधीं काय काय बंदोबस्त करायचा याविषयीं त्यांना समक्ष हुकूम द्यायचा आहे. जा तुम्ही.

दीनबंधु—जशी हुजूरची आज्ञा. [जातो.

जटाशंकर—(स्वगत) इथपर्यंत तरी सर्व योजना बिनबोभाट झाली. पूर्वी दोन वेळ माझा डाव फसला; परंतु या खेपेला अशी जय्यत तयारी ठेविली आहे, कीं माझ्या जबड्यांतली शिकार सोडवून नेण्याला, तुलसीदासाच्या देवालाच खालीं यावं लागेल.

[शिपाई व मुस्क्या बांधलेले भुजंग आणि घटीशेखर प्रवेश करतात. त्यांच्या मागून शरयू प्रवेश करिते व बाजूला उभी राहते.]

पहिला शिपाई—हुजूर, आपल्या पायाच्या कृपेनं, नदीपलीकडे न जाता या रामायण लिहिणाऱ्या बदमाषाला आणि त्याच्या साथीदाराला, या शहरांतच मोठ्या शिताफीनं आम्हीं पकडलं आहे. म्हणे, रामायण लिहितो आहे!

भुजंग—अहो, मीं रामायण लिहिलं नाहीं; मी तुलसीदास नाहीं. मी सवाई तुलसीदास मुळींच नाहीं. सवाई, दिढी, औट, अडीच मी कसलाच

तुलसीदास नाहीं, किंवा तुलसीदासाचा कोणताही प्रकार नाहीं. मी रामायण लिहीत नाहीं, लिहिलं नाहीं किंवा लिहिणार नाहीं. लिहिण्याचा इरादा देखील धरला नाहीं, धरीत नाहीं, धरणार नाहीं.

घटीशेखर—आतां नाकबूल करतां काय? हुजूर यांनींच रामायण लिहिलं आहे. कविराज, देऊं का दवंडी कीं अस्सल तुलसीदास ते हेच!

भुजंग—मी मुळींच अस्सल तुलसीदास नाहीं. मी कमअक्कल राजकवि आहे.

दुसरा शिपाई—तूं दहा वेळ स्वतः बोलला आहेस, कीं तूं सवाई तुलसीदास आहेस म्हणून! आम्हाला आतां सवाई इनाम मिळालं पाहिजे हुजूर!

जटाशंकर—गध्यांनो, तुम्हीं भलत्याच इसमाला पकडून आणलात! तुम्हां सर्वांना तोफेच्या तोंडीं देतों.

पहिला शिपाई—दयावंत हुजूर, यांत आमचा मुळींच कसूर नाहीं; या बदमाष लुच्चा दवंडीवाल्यानं आम्हाला फसवलं.

घटीशेखर— हुजूर, यांत माझा मुळींच अन्याय नाहीं. या कवि भुजंगानं, आपल्या जबाबदारीवर आपण स्वतःच तुलसीदास आहोंत अशी मला दवंडी द्यायला सांगितली. प्रथम हुजुरांनींच हा धंदा मला दाखवून दिला. मला काय, मी लोकांना सांगत सुटलों, कीं रामायण रचणारे खरे तुलसीदास ते हेच हुजूरचा हुकूम होईल तर हुजूरनीं रामायण लिहिलं म्हणून दवंडी देतों.

जटाशंकर—कोण आहे, तहशीलदार, दरोगे-( तहशीलदार जी म्हणून पुढें येतात.) या दवंडीवाल्या पाजी इसमाला उद्यां सूर्योदयाबरोबर तोफेच्या तोंडीं द्या.

शरयू—अमात्यसाहेब, कृपा करा आणि माझ्या पतीचे प्राण घेऊं नका—मला चुडेदान द्या. हे कविभुजंग तुलसीदासमहाराजांवर सारखे जळत होते आणि यांनींच तशी दवंडी द्यायला माझ्या समक्ष सांगितलं. माकडाच्या हातांत कोलीत दिल्यावर हीच गत व्हायची. रामायण तुलसीदासमहाराजांनींच लिहिलं आहे—मी रोज ऐकायला जात असते.

घटीशेखर—होय तर—टोपलीभर फळं घेऊन! पण या माकडानं त्यावर डल्ला मारला कीं नाहीं!

शरयू—तींच फळं भोगतां आहांत.

जटाशंकर—बाई, तुमच्या स्पष्ट बोलण्यावर खूष होऊन मी तुमच्या माकडाला-नव्हे नवऱ्याला—जीवदान देतों; पण यानं या राजपूरच्या हद्दींत पाऊल टाकतां कामा नये.

घटीशेखर—चला, माणसाचा माकड झालों, त्यामुळं शेपटीवरच निभावलं; नाहींतर माझी घटका भरलीच होती. ( शरयूस ) चल, उचल पाऊल, यावेळीं प्रत्येक पाऊल म्हणजे पळ !

शरयू—( घटीशेखरास ) अहो, अमात्यसाहेबांचे पाय तरी धरा; त्यांनीं तुम्हांला जीवदान दिलं आहे. ( तो अमात्याला साष्टांग दंडवत घालतो.) ( स्वगत ) आतां आपण कोणाला न कळत आश्रमाकडं जावं. तुलसीदासांना कांहींतरी दगा आहे खास. [ जाते.

घटीशेखर—( अमात्यास ) अमात्यसाहेब ! चोराला सोडून संन्याशाला सुळीं दिलंत, पण माझं तोंड कुणीं बंद केलेलं नाहीं. या राजपूर प्रांतांतून मला हद्दपार केलंत. पण आतां काय, मला सगळी दुनिया मोकळी आहे, तुमच्या अन्यायाचा डांगोरा पिटायला ! मी गरीब पाहून माझ्यावर शिस्त धरिलीत आणि या माझ्या साथीदाराला मात्र सोडून दिलंत !

जटाशंकर—थांब, तुझंही म्हणणं खरं आहे. तहशीलदार, सरकारी नोकरांची फसवणूक केल्याबद्दल या तोतया कवीलाही या राजपूर प्रांतांतून हद्दपार करण्यांत आलं आहे. या दोघांचीही गाढवांवरून धिंड काढून यांना उद्ईक हद्दपार करा.

घटीशेखर—हुजूर, गाढवांवर नगारा घालण्याचा हुकूम व्हावा, म्हणजे मी आयतीच गांवभर दवंडी देईन ! चला, तोतये तुलसीदास !

भुजंग—दुष्कर्माचा साथीदार दगा द्यायचाच. तुझ्यामुळं मला हद्दपारी भोगावी लागणार.

कनकांगी—( प्रवेश करून ) कसं माझ्या मनासारखं झालं. आतां आपण तुलसीदासाप्रमाणं शोभतां खरे ! मीही आपल्या मागोमाग येतें.

भुजंग—माझ्यामागं आलीस तर तुझा जीवच घेईन.

[ शिपाई भुजंग व घटीशेखरास घेऊन जातात; तहशीलदार व कनकांगी मागोमाग जातात.]

जटाशंकर—( स्वगत ) इतकी योजना करून देखील सुरुवातीलाच ठोकर

लागली–माझ्या नोकरांवर कामगिरी सोंपविली हीच चूक झाली. कांहीं हरकत नाहीं.

दीनबंधु—( प्रवेश करून ) हुजूर चलावं–फार वेळ झाला !

जटाशंकर—तुम्हींच वेळ केलात—

दीनबंधु—सम्राटानं नजर केलेली समशेर कमरेला लटकवायला जरा वेळ लागला. सम्राटाच्या सेवेंतच माझा प्रत्येक क्षण जात असतो हें हुजूरना विदित आहेच.

जटाशंकर—बरं, चला–जास्त वटवट नको. पुढं व्हा. [ जातात.

---

## प्रवेश तिसरा

[ तुलसीदासाचा आश्रम. रामजन्मोत्सवाची पूर्वरात्र. मंडप बांधला आहे, कलावती पाळणा बांधीत आहे व "रामरंगीं रंगलें मन" हें पूर्वोक्त भजन गात आहे. तुलसीदास एका बाजूस आसनावर रामायण लिहीत आहेत. मदनमोहन कट्यार हातांत घेऊन आश्रमासभोंवतीं पहारेकऱ्याप्रमाणें फिरत आहे.]

कलावती—( मदनमोहनास ) तूं असा आश्रमासभोंवतीं उगाच काय प्रदाक्षिणा घालतो आहेस ? इकडे येऊन मला थोडी मदत कर.

मदनमोहन—छेः माझं काम सोडून मी नाहीं येत.

कलावती—नुसतं पांखराप्रमाणं घिरट्या घालायचं काम करतो आहेस–मग त्यापेक्षां आंत जाऊन झोंप तरी घे.

तुलसीदास—खरंच, निष्कारण कां जागरण करतो आहेस ? नीज जा.

मदनमोहन—कां ? तुम्हां दोघांनाही या मदनाचा त्रास होऊं लागला आहे वाटतं ?

कलावती—चल, चहाटळ कुठला !

तुलसीदास—त्यानं काय गैर सांगितलं !

कलावती—सरळ बोललं तरी त्यावर कांहींतरी उत्तर द्यायचं ! आपण इकडं अगदीं लक्ष द्यायचं नाहीं अं; आपलं काम चालू द्यायचं. खरंच मदन, तूं आज असा कां फिरत राहिला आहेस ? आणि ही कट्यार कशाला हातांत ? सोंगच आहे कांहींतरी !

**मदनमोहन**—तुम्ही इतकी रात्र आजच जागे आहांत, तेव्हां तुम्हांला हें सोंग वाटणारच. पण हा माझा नित्याचा पहारा आहे, अन् मध्यरात्रीपर्यंत तो असाच चालणार. तुझ्या लग्नाच्या दिवशीं बाबासाहेबांच्या कमरबंदांतून ही कट्यार मी काढून घेतली ती पाहुण्याचे वेळीं, मी रोज रात्रीं जवळ बाळगीत असतों. आजपर्यंत कोणी चोरदरोडेखोर फिरकला आहे का आश्रमाकडे ?

**कलावती**—चोर-दरोडेखोर या आमच्या आश्रमांतून काय चोरून नेणार ?

**मदनमोहन**—कदाचित् तुला चोरून नेतील म्हणून मी असा हत्यारबंद आहें.

**कलावती**—बरं, इकडे आण ती कट्यार; आज तरी मला तिचा उपयोग आहे.

**मदनमोहन**—काय करणार आहेस या कट्यारीनं ?

**कलावती**—प्रभूच्या पाळण्याचे दोर कापतें म्हणजे चारीही बाजू सारख्या होतील. (कट्यार घेऊन दोर कापते व पाळण्याच्या कोपऱ्यावर ठेवते.) तूं आंत जाऊन आतां चार घटका स्वस्थ झोंप घे—उजाडल्यानंतर दिवसभर तुला क्षणाचाही विसांवा मिळणार नाहीं.

**तुलसीदास**—खरंच, तूं आतां विश्रांति घे आम्ही दोघेंही जागीं आहोंत ना बरं आर्धी-आम्ही रात्रभर जागणार आहोंत.

**कलावती**—शिवाय, रामनामाची जाग असल्यावर दुसरी जाग पाहिजे कशाला ? महाराज, आपलं लक्ष इकडं कां बरं ? सूर्योदयापूर्वी ग्रंथ समाप्त व्हायला पाहिजे ना ? उद्यां श्रोत्यांची काय गर्दी होईल ! महाराज प्रतापसिंह मुद्दाम संपूर्ण रामायण ऐकण्याकरितां यायचे आहेत. ग्रंथ अपुरा राहिला तर त्या सर्वांची किती निराशा होईल बरं ! आतां शेवटचा थोडा भाग राहिला आहे तेवढा पुरा झाल्यावांचून मी आपल्याला आसनावरून उठूं द्यायची नाहीं.

**तुलसीदास**—वाः ! कवीला कैचींत धरून काव्य कधीं पुरं होत असतं वाटतं ? मला तर आतां शीण आला आहे. तूं आपल्याच नादांत गर्क आहेस; पाळणा बांधलास-तोरणं बांधलीस-पुरं झालं इतकं काम. बायकांना पाळण्याची मोठी हौस असते, नाहीं ? आणि ती मूल होण्यापूर्वीच !

**कलावती**—पुरे झालं. भलत्याच वेळीं भलतीच थट्टा बरी सुचते !

**मदनमोहन**—आतां इथं आपलं काम नाहीं. हें लाडकं भांडण असंच चालायचं ! (जातो.

**कलावती**—(तुलसीदासाजवळ जाऊन) कां पुढच्या कामाकडं लक्ष

लागत नाहीं वाटतं ? आतां मदन येथून गेला आहे आणि मीही तें वाहन शृंगारून ठेवतें–आपल्याला आतां अगदीं शांतता मिळेल. तो असला म्हणजे कांहीं तरी त्याची बडबड चालतेच.

तुलसीदास—आणि तुझा मात्र सारा मुक्याचा कारभार ! होय ना ?

कलावती—डोकींत लहर आली वाटतं–मी माझ्या कामाला लागतें कशी; म्हणजे आपलं चित्त लिहिण्याकडं लागेल.

तुलसीदास—तुला नाहीं त्या कामाची भारीच हौस ! सकाळीं आपले भक्तजन येतील आणि अर्ध्या घटकेच्या आंत सर्व तयारी करतील. तुला स्वतःला हे भलतेच श्रम घेण्याचं कांहीं कारण नाहीं.

कलावती—प्रभु रामचंद्राच्या जन्मोत्सवाची तयारी करण्याचे कोणाला बरं श्रम वाटतील ? उद्यां दाशरथी-रामाचा जन्म आणि तुलसीरामायणाचाही जन्म ! अशी पर्वणी पुन्हा कधीं येणार ? दशरथाच्या पोटीं प्रभु रामचंद्रांनीं अवतार घेतला आणि आपल्या पोटीं रामायण अवतरणार–खरं ना ? हा केवढा भाग्याचा दिवस उद्यां उगवणार !

तुलसीदास—रामजन्माला कौसल्या माता कारण झाली, तशी तुलसी-रामायणाला, तूं–कला कारण आहेस हेंही तितकंच खरं आहे. तुझ्या दिव्य उपदेशावांचून व सतत प्रोत्साहनाशिवाय हा ग्रंथ अर्धवटच राहिला असता; होय ना ?

कलावती—( त्यांच्या तोंडावर हात ठेवून ) मी असलं भलतंच बोलूं देणार नाहीं गडे !

तुलसीदास—"गडे" !! उच्चारलास का पुन्हा तो वेड लावणारा शब्द ! प्रथमच्या भेटीला याच मादक शब्दानं मला गुंगवून टाकलंस–आणि आतां देखील पुन्हा माझं मन अस्वस्थ केलंस.

कलावती—( स्वगत ) देवा, माझ्यापुढें काय मांडून ठेवलं आहेस ! महाराज, माझी चूक झाली; मला क्षमा करायची–चुकून तो मेला शब्द माझ्या तोंडून बाहेर पडला—

तुलसीदास—तुझ्या तोंडून तो चुकून बाहेर पडला; पण त्या एकाच शब्दानं आपल्या प्रथम भेटीचा अद्‍भुतरम्य प्रसंग, एखाद्या चित्रपटाप्रमाणं माझ्या-पुढं उभा केला आहे ! तें तुझं तेजस्वी भाषण, दृष्टीला दिपविणारं सहजसौंदर्य,

प्रत्येक भावांत उसळून येणारी अंतर्यामींची रसिकता, कौमार्याची मोहकता व यौवनाचा अल्लडपणा, हीं जशींच्या तशींच माझ्यासमोर या क्षणीं दिसत आहेत.

३०. पद

**मधुरानना तुलना ना। रूप, शील, गुण, तेज दावुनी, दिपविलेंसि नयनां ॥ ध्रु० ॥ तनुलता न विद्युल्लता भासे। दिव्यवाणी अशरीरिणी खास ॥ पूर्णचंद्र करि वदनीं निवास। स्मृति मधुर मोहि मदीय मना ॥**

प्रिय वस्तूच्या प्रथमदर्शनप्रसंगाची स्मृति अंतःकरणावर अधिक खोलवर कोरलेली असते, यांत संशय नाहीं. विरही दुष्यंतानं शकुंतलेचं स्मृतिचित्र काढलं, तें देखील तिच्या प्रथम-दर्शनप्रसंगाचंच ! शकुंतलेच्या मुखाभोंवतीं घिरट्या घालणारा भ्रमर आणि तुझ्या मुखांतून बाहेर पडणारा मधुर 'गडे' दोन्हीही सारखेच. एक मधु चाखण्याकरितां घिरट्या घालणारा; दुसरा मधुपान करून जिव्हाग्रावरून बाहेर पडलेला ! या दोहोंनाही कामी जन शासन करायला तयार असतातच !

कलावती—(स्वगत) हें चिन्ह कांहीं ठीक दिसत नाहीं. प्रभो ! माझ्या पुण्याईचा जोर आज संपलाना ? (प्रकट) महाराज, माझ्या एवढ्याशा अपराधाला —त्या मेल्या यःकश्चित् एका शब्दाला—आपण शासन करणार ? आपलं चित्त चाळविण्याकरितां किंवा कसलीही स्मृति जागृत करण्याच्या हेतूनं मीं तो शब्द उच्चारला नाहीं. चुकून तो तोंडांतून गेला. मला क्षमा करायची, मी पदर पसरतें. या उरलेल्या रात्रीचा एकएक क्षण जसजसा जात आहे तसतसं माझ्या रक्ताच्या प्रत्येक थेंबाचं पाणी पाणी होत आहे; आणि अगदीं हातीं आलेलं पुण्यफळ, केवळ स्वैरवृत्तीमुळं आपण दवडीत आहांत असं वाटूं लागलं आहे. महाराज, माझी हात जोडून पदर पसरून येवढी एकच प्रार्थना आहे: ही एकच रात्र-हा रात्रीचा राहिलेला एकच प्रहर—एवढ्या अवधींत माझ्याकरितां—या आपल्या कलेकरितां—एकदां सर्व शक्ति एकवटून, जीवाभावानं झटून, हा दिव्य ग्रंथ पुरा करावा आणि आपल्या उभयतांच्या जीविताचं सार्थक करावं. एवढंही जर माझ्याकरितां आपण नाहीं केलं, तर ही कला जगांत तोंड दाखविणार नाहीं. सर्वस्वीं पत्नीच्या आधीन झाल्यामुळं हा दिव्य ग्रंथ अपुरा राहिला अशी अपकीर्ति ऐकण्यापेक्षां मी जिवंत नसलेली बरी !

तुलसीदास—वेडीच आहेस. बरं, तूं आधीं इथं येऊन बैस आणि मी लिहीत जातो तसतशी तूं वाचीत जा. तुझ्या मधुर आवाजाच्या नादानं माझी वृत्ति स्थिरावेल. हें पान वाच, तोंपर्यंत मी पुढें लिहीत जातों.

( कलावती काव्य वाचते. तुलसीदास लिहीत जातो.)

तुलसीदास—हें घे पुढचं पान.

कलावती—( वाचते ) हें काय ? हा राधाकृष्णविलास रामायणांत कोठून आला ? ( स्वगत ) प्रभो रामचंद्रा ! नाथांना क्षमा करा. ( प्रकट ) महाराज, आपण काय लिहीत आहांत याचं भान आहे का आपल्याला ?

तुलसीदास—हे सर्व प्रयास व्यर्थ आहेत. ( पोथी दूर सारून उठतो.) अंतःकरणानं पेट घेतल्यावर त्याच्या ज्वाला मस्तकांत जाऊन भिनायला कितीसा वेळ लागणार ! माझं चित्त चळलं—बुद्धि बेहोष झाली—वृत्ति स्वैर झाली आणि प्रतिभा भ्रष्ट झाली—

कलावती—नका, महाराज नका, असं अभद्र भाषण करून रामचरित्राचा महिमा गाणाऱ्या आपल्या पुण्यवाणीला विटाळूं नका. देवा, हें ऐकण्यापेक्षां मला मरण कां येईना ?

तुलसीदास—या वेळीं तुझा प्रत्येक शब्द मला मन्मथाच्या तीव्र शराप्रमाणं व्याकुळ करीत आहे. तुझ्या प्रत्येक आविर्भावांत मदनाचा उन्माद मला दिसतो आहे. तुझ्या करुण प्रार्थनेंत फक्त प्रणययाचनेचा गूढभाव मला स्पष्ट भासतो आहे. व माझं मस्तक भणाणूं लागलं. आतां इथं राहून तुझ्यापासून दूर असणं—पण नकोच तो विचार—मला आंत तळमळत ठेवून, तूं खुशाल तुझं रामायण पुरं कर.— [ आंत जातो.

कलावती—(स्वगत) मी रामायण पुरं करूं ! आणि आपण तिकडे तळमळत राहाणार ? मला या बोलण्याचा अर्थ समजत कां नाहीं ? काय करावं—

३१. पद

**पर्वकालीं पुण्य सरलें, जीव दुर्गति वरितसे । अशुभ ऊर्मी उसळल्या या, कार्यनौका बुडतसे ॥ ध्रु०॥ विषयविलासां वांछिति । पुण्यनाम निज लांछिति । संकल्पा पति वंचिति । नलिनी दिसतां भृंगसे ॥ १ ॥**

सीतामाई, पत्नीचा धर्म कोणता तें आतां तूंच मला सांग. तुझं चरित्रच

पत्नीचा धर्म स्पष्ट शब्दानं सांगत असतांना तुला विचारावं तरी कशाला? विषयवृत्तीला भक्तीचं बंधन असेल तरच संसार मोक्षप्रद होतो; असं नाथ आपणच सांगत आलांत ना? शुभ समयाला अशुभ भावनेचा प्रादुर्भाव म्हणजे पुण्यक्षय; आणि पतीचा पुण्यक्षय साधणारी पत्नीच नव्हे. या माझ्या महाकवींना पुन्हा कार्यक्षम करण्याचा कोणता मार्ग आहे? विषयवासनेनं बेहोष झालेल्या माझ्या पतीला माझ्यामधील कोणती शक्ति परावृत्त करूं शकेल? नवनीतानं अग्नि विझविण्याचा प्रयत्न करणं जसं निष्फळ त्याप्रमाणं माझी स्थिति झाली आहे.—

३२. पद

**तुटला क्षीण तंतु आशेचा। ठाव मानसाचा सुटला॥धृ०॥ ललना नवनीतासम घातकी। शमवी नच परि चेतवि अनला ॥१॥ केंवि घात साधूं उभयांचा। अनुसरोनि पतिला या काला॥२॥**

देवा, मी आतां काय करूं? हातीं आलेलं पुण्यफल दवडून नाथांच्या विषयवृत्तीनं पुन्हा उसळी घेतली. स्त्रीजात म्हणजे महात्म्यांच्या अधःपाताचं अमोघ अस्त्र, असा कलंक स्त्रियांच्या कपाळावर विश्वाच्या अंतापर्यंत कायम ठेवण्याचा प्रभो, तूं संकल्पच केला आहेस का? रामचंद्रा, जानकीमाईसारखी पतिप्रेमाची प्रत्यक्ष प्रतिमा तुझी अर्धांगी असूनही, स्त्रीजातीवरील हें लांछन काढून टाकावं असं नाहीं का तुझ्या मनांत येत? विषयसुखाला लालचावलेली नागीण, पतीला विषयकर्दमांत लोळविणारी वाघीण, हीच तप्तमुद्रा स्त्रीजातीच्या कपाळावर जळजळीत अक्षरांनीं कायमची कोरली जाणार ना? प्रभो! जानकीमातेला आपल्या प्रेमळ सहवासाचं सुख उभ्या आयुष्यांत कितीसं मिळालं? असं असून, संसारसुखाची त्या साध्वीनं कधीं परवा केली? केवळ तुमचं अवतारकार्य तडीला जावं, तुमचं चरित्र निष्कलंक रहावं यासाठीं सीतामाईनं कोणतं दिव्य करायला माघार घेतली? दिव्य! अग्नीचं दिव्य, वनवासाचं दिव्य, दुष्टाच्या बंदिवासाचं दिव्य—सर्व दिव्यांतून ती माउली निष्कलंक पार पडली ना? आणि मी त्या साध्वीचं पावन चरित्र पुढें ठेवून वागण्याचा बाणा व्यर्थ धरला म्हणायचा! पण व्यर्थ काय म्हणून? पतीच्या शवाबरोबर सहगमन करणारी साध्वी जर परलोकीं सद्गति प्राप्त करून

घेते, तर पतीच्या कीर्तीकरितां सती जाणारी पत्नी, इहलोकींच पतीच्या कीर्ती-रूपानं अमर-पदाला कां नाहीं पोहोंचणार ?

तुलसीदास—( दरवाजांतून ) कला ! कला !—काय, माझ्या हांकेकडे तुझं लक्ष नाहीं ? तर मग मीही निश्चयानं सांगतों कीं रामायण माझ्या हातून पुरं होण्याची आशाच नको–तें पुरं करणं मला कर्तव्यच नाहीं. [ आंत जातो.

कलावती—झाला, पुरता पुण्यक्षय झाला ! यशाची सद्दी संपली ! तरी पण, माझं अखेरचं कठोर कर्तव्य मला समोर स्पष्ट दिसूं लागलं आहे. जानकी-माते, अशोक वनांत असतांना, तुझ्या अंगीं बाणलेलं सर्व धारिष्ट मला दे.—

२३. पद

**अतुल धैर्या देइ मातें, या समयातें, माते ! । केवि नाथां आंवरूं मी विसरूनिया तें नातें ॥ ध्रु०॥ दशकंधरबंदिमाजि जाच सोशिलास कसा। अंगीकृत-व्रतपालनिं देइ मला धीर तसा। स्वतनु जाळुनि उजळिलेंसी पतिनामातें, माते! । स्पष्ट दावी चरित तव हें दिव्यपथातें मातें ॥ १ ॥**

तुझ्या दिव्य चारित्र्याचं अल्पानुकरण करणाऱ्या या तुझ्या कन्येचा आत्मयज्ञ स्वीकारून, स्त्रीजातीच्या कपाळावरचा काळिमा काढून टाक आणि माझ्या नाथांचं यश अजरामर कर. अहाहा ! ही पहा माझी माता ! मला मायेनं कुरवाळण्याकरितां आपले हात पुढं करीत आहे ! ( पाळण्यावरील कट्यार तिच्या हातीं लागते.) माझ्या देवीनं हा पहा, कट्यारीचा कौल दिला ! माझ्या आईला माझा बळी मान्य झाला !–( कट्यार उगारून ) पण आईकडे गेलें तर नाथांचं दर्शन पुन्हा या हतभागिनीला होईल का ? कां नाहीं होणार ! माता कितीही मायाळु झाली तरी मुलीला निरंतर माहेरीं ठेवून घेत नाहीं. हें रामलीलेचं महाकाव्य संपूर्ण झालं म्हणजे माझं वास्तव्य नाथांच्या चरणासन्निध त्यांच्या कीर्तिरूपानं निरंतर नाहीं का होणार ? मग दुःख कसलं आणि विरहाची भीति तरी कोणाला ? दुःख इतकंच कीं, नाथांना हवंसं वाटणारं त्यांच्या सत्तेचं हें शरीर मी त्यांना नकळत त्यांच्यापासून हिरावून नेणार; कांहीं चिंता नाहीं—स्त्री-जातीवर लादलेल्या अनृत, माया, लोभ, साहस इत्यादि अनेक दुर्गुणराशींत चौर्यही सहज खपून जाईल. पण अलोट पतिप्रेमाचा मोबदला मी नाथांना

दुःखाच्या रूपानं देत आहे असं नाहीं कां होणार? नाहीं—माझ्या देहावरील प्रेमामुळं नाथांनीं आपला देह मृत्युमुखांत दिला होता—मग नाथांच्या दिगंत कीर्तीकरितां, स्त्री-जातीवरील लांछन धुवून काढण्याकरितां, कोट्यवधि भक्त-जनांच्या उद्धाराकरितां मी माझ्या सर्वस्वाची या जाज्वल्य कर्तव्यकुंडांत आहुति देणं अगत्याचं नाहीं असं कोण म्हणेल? माझ्या पतिदेवतेच्या चरणीं ही माझ्या देहाची कुरवंडी कां रुजू होणार नाहीं? (रामायणाच्या पोथीवर मस्तक ठेवते.) प्रभो रामचंद्रा! आई जानकी! माझ्या नाथांना सुखी ठेवा. रामभक्त म्हणून त्यांची कीर्ति दिगंतीं पसरवा आणि आपलं पुण्यकथाकाव्य नाथांच्या हातून सत्वर पूर्ण करावा—नाथ, आपल्या चरणीं मला निरंतर आसरा द्या. (कट्यार खुपसून घेते.) महाराज-नाथ—सूर्योदयापूर्वीं रामायण पूर्ण करा एवढंच या दासीचं—अखेरचं—मागणं—आहे—मी येतें आतां—

तुलसीदास—(प्रवेश करून) काय बरळते आहेस तूं! तुला भ्रम तर झाला नाहीं! मीं इतका वेळ केवढ्या आशेनं वाट पाहिली आणि—हें काय रक्त! तुझ्या छातींत ही कट्यार! कोणा दुष्टाचं हं कृत्य!

कलावती—नाथ, आपलं दर्शन झालं, मी कृतार्थ झालें—माझी इच्छा रामचंद्रांनीं पूर्ण केली. मीं माझ्या हातांनीं हा माझा बळी दिला. रामायण सूर्योदयापूर्वीं संपवा. रामनवमीला आपलें दिव्य काव्य प्रगट व्हावं एवढ्याकरितां मी येतें—आपल्या चरणांचा अंगारा माझ्या कपाळीं लावा—सीताराम नाथांचें काव्य—अमर—करा—राम— [मरते.

तुलसीदास—कला, कला! माझ्या लाडके, माझ्याशीं एक शब्द बोल. कलेचं हें मृत-शरीर, हें काय बोलणार! माझ्या क्षणैक उन्मादाचा शेवटीं हा परिणाम झाला? माझ्या रामायणाकरितां, माझ्या कलेनं आपल्या प्राणाचा बळी दिला! माझ्या जीविताचा ग्रंथ आटोपला—माझं रामायण संपलं. कसलं हें रामायण! प्रेमळ स्त्रीच्या सान्निध्यांतही विरक्ताप्रमाणं वृत्ति ठेवून मीं हें रामायण लिहलं, त्याचा हा विपरीत परिणाम! अमरपदाऐवजीं यमसदनाला पाठविणारं रामनामामृत तरी कसलं? माझ्या कलेच्या रक्तानं दूषित झालेलं हें काव्य पुरं करायला हा कवि जीव ठेवणार कशाला! (कलेच्या शरीरांतील खंजीर काढून आपल्या छातीवर रोखतो. इतक्यांत "राम" "राम" अशीं अक्षरं कानांवर पडल्याचा भास होऊन, आश्चर्यानें) हा रामनामाचा

ध्वनि कोठून ऐकूं येतो आहे ! इथून ! नव्हे; इथून ? नव्हे. ( तिच्या हृदया-जवळ कान नेऊन ) हां, इथून ! अहाहा ! कलेच्या हृदयांतून वाहणाऱ्या रक्तबिंदूंतून हा रामनामाचा अक्षय्य ध्वनि उसळून निघतो आहे ! त्या पुण्य नामोच्चारानं हा आश्रम जणुं दुमदुमून राहिला आहे. अहाहा ! प्रभुनामाकरितां जिवाचे बंध तोडून, शरीराचं कवच फोडून अखिल विश्वाला रामनामानं रंगविणारं, तेंच खरं जिवंत रक्त ! नाहींपेक्षां नानाविध वासनेनं काळवंडलेलं हें माझं मुरदाड रक्त ! पण मुरदाड काय म्हणून ? रामनामाच्या गौरवाकरितां, तिच्या नालायक पतीच्या कीर्तीकरितां स्वतःचं रक्त सांडून माझ्या कलेनं आपला जन्म सार्थ केला; त्याचप्रमाणं रामनामावर पोसलेला हा कवि, या देवतेच्या अखेरच्या आज्ञेप्रमाणं, हातीं घेतलेलं काव्य या जिवंत रक्तानं पूर्ण करून, कलेसह अढळपदीं जाऊन बसणार ! " मोहाचं पर्यवसान योगांत होणं हेंच खरं कविहृदय " अशीच माझ्या कलेची शिकवणूक आहे. आतां हाच माझा अढळ योग ! ( कलावतीच्या हृदयांतून वाहणाऱ्या रक्तांत लेखणी बुडवून लिहूं लागतो. )

जटाशंकर—( कांहीं वेळानें पांच सहा शिपायांसह प्रवेश करून ) तुम्ही दोघे हलकेंच मागच्या बाजूनं जाऊन त्या हरामखोराच्या मुसक्या आंवळा, आणि तुम्ही त्याच्या स्त्रीला—( पुढें जाऊन ) पण हा काय आसुरी प्रकार ! बायकोच्या छातींत खंजीर खुपसून त्यांतून वाहणाऱ्या रक्तानं हा रामायणाचा धर्मग्रंथ लिहितो आहे ! हा तुलसीदास मनुष्य आहे कीं राक्षस ! ( पुढें होऊन ) पकडा या हरामखोराला—या स्त्रीला जबर जखम झालेली दिसते,—सारखं रक्त वाहातं आहे आणि हा कसाई बायकोच्या रक्ताची शाई करून काव्य लिहितो आहे !

तुलसीदास—हेंच खरं कविहृदय ! आणि हेंच खरं कवीचं योगसाधन ! ( शिपाई पुढें सरसावतात, त्यांस ) हां खबरदार त्या पुण्य-कलेवराला स्पर्श कराल तर !

जटाशंकर—काय कलेवर !

तुलसीदास—होय. प्रभु रामचंद्राच्या विमल भक्तीचं सौभाग्य लुटीत जाणाऱ्या, आणि प्रभुयशाचा परिमल दिगंतीं पसरणाऱ्या माझ्या कलेचं हें पुण्य कलेवर !

जटाशंकर—अरेरे! शेवटी माझा व्यूह असा कायमचा ढांसळून पडला काय? काय करूं रे! या तुलसीदासाच्या नरडीचा घोट घेऊं, कीं याच्या आश्रमाला आग लावून त्यांतच या नीचाची राखरांगोळी करूं! या कलेचं हरण करण्याचा हा माझा तिसरा प्रयत्न आणि तो सिद्धीला नेण्याचा इतका कडेकोट बंदोबस्त करूनही शेवटीं असं अपयश पदरांत पडावं!

तुलसीदास—अमात्यसाहेब! मानवी सत्तेचं हिशेबी कोष्टक कितीही कांटेतोल असलं तरी परमेश्वरी संकेताबरोबर त्याचा कधींच मेळ बसत नसतो.

जटाशंकर—माझ्या सत्तेचा मेळ आतां तुझ्या गळ्याभोंवतीं बसणार. आपल्या स्त्रीचा कट्यारीनं खून करून मला परमेश्वरी संकेताचं पुराण सांगतोस? तूं खून केलास कीं नाहीं याचा प्रथम जाब दे.

तुलसीदास—माझा जाब विचारणारे तुम्ही कोण?

जटाशंकर—मी कोण? मी दिल्लीपति अकबर बादशहाचा अमात्य! माझ्याच हुकुमानं तूं हद्दपारीची शिक्षा भोगीत आहेस, हें इतक्यांत विसरलास वाटतं?

तुलसीदास—आणि म्हणूनच मी विचारतों, कीं माझा जाब घेण्याचा तुम्हांला काय अधिकार? अमात्यसाहेब, तुमची अधम वासना सिद्धीला गेली नाहीं, म्हणून बेफामपणानं आपणच आपल्या अधिकाराच्या हद्दीबाहेर जात आहांत. आपल्या हुकुमानं मी हद्दपार झालेला इसम आहें. आणि म्हणूनच, सम्राटाच्या हद्दीबाहेरील या माझ्या आश्रमांत येऊन माझा जाब विचारण्याचा अधिकार प्रत्यक्ष सम्राटालाही पोहोंचत नाहीं. मग तुम्ही तर सम्राटाचे केवळ पाय चाटणारे श्वान! तुमच्या भुंकण्याला इथं कुणीही जबाब देणार नाहीं.

जटाशंकर—अरे पाहतां काय! पकडा या हरामखोराला! याला खून चढल्यामुळं असा हा बेफाम बरळतो आहे. यानंच खून केला यांत संशय नाहीं.

तुलसीदास—कुणाचा खून?

जटाशंकर—या स्त्रीचा—तुझ्या बायकोचा खून तूं केलास.

दीनबंधु—(प्रवेश करितो.) काय माझ्या मुलीचा—खून? या नीचानं केला! माझा सर्वस्वीं घात झाला.—आतां कसला मी राजाबहादुर होतों!

शरयू—(प्रवेश करून) काय! कलावतीबाईचा खून! देवा, हें काय

पाहुण्याचं माझ्या नशिबीं आणलंस. मला चांडाळणीला वेळेवर कसं येत आलं नाहीं ? शेवटीं या दुष्टांनीं दावा साधलाच !

मदनमोहन—( प्रवेश करून ) काय ? माझ्या कलाताईचा खून ! कलाताई, या तुझ्या अनाथ लेकराबरोबर एक शब्द तरी बोल ! देवाघरीं जातांना तुला माझी आठवण कशी झाली नाहीं ! पण हें भयंकर कृत्य केलं कोणीं ? महाराज ! बोला, कलाताई कलाताई ! मला तूं अवचित कशी सोडून गेलीस ! महाराज, बोला. कुणाचं हें नीच कृत्य ? त्या दुष्टाचं नरडं मी माझ्या दांतांनीं फोडतों.

दीनबंधु—त्या नीचाला बोलायला तोंड कुठं आहे !

जटाशंकर—स्वतःच्या गुन्ह्याचा कबुलीजबाब निढावलेले गुन्हेगार इतक्या सहज रीतीनं देत नसतात. त्यांना चौदावं रत्न दाखविलं पाहिजे.

मदनमोहन—काय ? महाराजांच्यावर खुनाचा आरोप ? नीचांनो, रौरव नरकांत पडाल. महाराज ! आपण बोलत कां नाहीं ? यांना जाब कां देत नाहीं ?

तुलसीदास—कुणाला जाब देऊं ! माझा जाब घेणारा जीव अढळपदीं जाऊन प्रभूचं यशोगान गात बसला आहे. काय असल्या गलिच्छ लोकांना मी जाब देऊं ? ज्याप्रमाणं सम्राटाच्या हद्दीबाहेर मी आहें, त्याचप्रमाणं मानवी व्यवहाराच्याही सीमेबाहेर मीं आतां पाऊल टाकलं आहे. माझं रामायण मीं पुरं केलं आहे. माझं जीवितकार्य सांग झालं. माझा निवाडा करण्याचं कार्य आतां मानवी शक्तीच्या बाहेर आहे; माझा न्याय प्रभु रामचंद्रांनींच केला पाहिजे.

जटाशंकर—अशा बेजबाबदार भाषेनं इथं कुणाचंच समाधान होणं शक्य नाहीं. अंगावर उठणारे आसुडाचे वळ देवाचा हवाला दिल्यानं कमी होत नसतात. देवाघरचा न्याय स्वर्गाच्या हद्दींत पाऊल ठेवल्यानंतर सुरू होतो.

दीनबंधु—तूं स्वतः हद्दपार गुन्हेगार असलास तरी तुझी बायको सम्राटाच्या या राजनिष्ठ सेवकाची कन्या होती. आणि सम्राटाच्या प्रजेचा खून करणारा गुन्हेगार कोणत्याही ठिकाणीं कुणाच्याही हद्दींत सांपडल्यास तो देहान्तशिक्षेला पात्र होतो, असा सम्राटाचा कायदा आहे. सम्राटानं नजर केलेल्या या समशेरीनं तुझं मस्तक धडावेगळं होण्यापूर्वीं केलेल्या अपराधाचा उच्चार करून सम्राटाचा न्यायीपणा जगजाहीर कर. अमात्यसाहेबांसारख्या

महात्म्यापुढं गुन्हा कबूल करण्याची संधि तुला मिळाली, हें तुझं नशीब समज.

जटाशंकर—काय, अजूनही बोलत नाहींस? अरे, याला झाडाशीं आंवळून, याच्या अंगावर कोरडे उडवून याची चामडी लोळवा. त्यावांचून हा कबूल होणार नाहीं.

मदनमोहन—महाराज, आपण मुकाट्यानं या हालअपेष्टा सोसणार? माझ्या मनांत नको ती शंका येण्यापूर्वीं घडलेली हकीगत मला आपण एकदां सांगा.

तुलसीदास—काय, तुझ्या मनांत शंका? छेः! तुझ्या मनांत शंका येतांच कामा नये. या जगांत या अखेरच्या घडीला जर माझ्या प्रेमाचा एखादा धागा शिल्लक राहिला असेल तर तो तूंच! कारण, तुझ्यामुळं मला कलेचा लाभ झाला, आणि कलेमुळं माझं जीवितकार्य तडीस गेलं. या लोकांची मला कवडीचीही किंमत नाहीं, किंवा मला माझ्या प्राणांचीही पर्वा नाहीं. या वेळीं पर्वा काय ती तुझ्या बालकाच्या कोंवळ्या अंतःकरणाची! माझं देहावसान होण्यापूर्वीं तुझ्या मनाचं शंकासमाधान करण्याची जबाबदारी माझ्यावर—छेः! माझ्यावर कसली? प्रभुरामचंद्रावर आहे. आणि त्या प्रभूलाच माझ्या कृत्याचा कौल लाव. म्हणजे तुझ्या शंकेचं समाधान होईल.

जटाशंकर—अजूनही उडवाउडवी करतोस त्या अर्थीं शंका कसली? तूंच खून केलास आणि याक्षणीं देहान्तप्रायश्चित्त हेंच समाधान.

शरयू—अमात्यसाहेब, मी एक श्रद्धाळू स्त्री आहें. माझी एवढी प्रार्थना ऐकावी. तुलसीदासमहाराजांना देहान्त शिक्षा देण्यापूर्वीं त्यांच्या म्हणण्या-प्रमाणं या मुरलीधराच्या मूर्तीला मी कौल लावतें.

जटाशंकर—असले मूर्खपणाचे चाळे करायला मला फुरसद नाहीं; या नीचाचा निकाल लावून मला सूर्योदयापूर्वीं परतलंच पाहिजे.

शरयू—महाराज, या ३ त्याला पाव घटकासुद्धां लागणार नाहीं. माझी एवढी विनंति ऐकावी. देवाच्या घरीं होणारा न्याय आपण आपल्या हातीं कशाला घेतां? श्रीरामचंद्र तुलसीदासांचं दैवत आहे. तें आपल्या भक्ताचा कदाचित् पक्षपात करील; पण, या मुरलीधर गोपालकृष्णाला तुलसीदासांचा पक्षपात करण्याचं कांहींच कारण नाहीं. माझ्या या बोलण्याची एकदां प्रचीति तरी पाहावीच.

जटाशंकर—या फत्तराच्या देवाची कसली प्रचीति पहायची ? या मुरलीधरासमोर, एक बदमाष प्रत्यक्ष आपल्या बायकोचा खून करतो ! आम्हीं हिंदूंचीं देवालयं म्हणजे वाटेल त्या अनाचाराचीं सुरक्षित ठिकाणंच झालीं आहेत. तुमच्या या भोळसट मूर्खपणाच्या अंधश्रद्धेमुळं हिंदुधर्माचं दुनियेंत हंसूं होत आहे. हा दगडाचा देव आतां निवाडा करणार म्हणे !

तुलसीदास—परधर्मीयांच्या उच्छिष्टावर पोसलेल्या कलिपुरुषा ! धर्माची आणि श्रद्धेची उठाठेव तुला कशाला ? आर्यधर्माचा, आर्यसंस्कृतीचा, आर्यभूमीचा, किंवा आर्यांच्या अंगांत खेळणाऱ्या सात्त्विक रक्ताचा ज्याला यत्किंचित् सुद्धां अभिमान नाहीं, असा भावनाशून्य नरपशु तूं ! यवन बादशहाचे पाय चाटणाऱ्या तुझ्या जिभेला धर्माची आणि श्रद्धेची भाषा पाहिजे कशाला ? आर्यस्त्रियांचं रक्त यवनांच्या संपर्कानं बाटवूं पाहणाऱ्या अधमा ! हातीं अमर्याद सत्ता असूनही तीन वेळ तुझा नाच प्रयत्न फसला. मूर्खा, आर्य स्त्रियांच्या रक्तांत मुरलेली दिव्य धर्मश्रद्धाच त्यांना भावी संकटांतून सुटकेचा अचूक मार्ग दाखविते. अजून तरी नीट डोळे उघड. अस्सल आर्यांचं जिवंत रक्त जिच्या नसानसांमधून वहात असतं ती प्रत्येक भारतकन्या धर्मश्रद्धेनं प्रेरित होऊन प्रसंगीं आपल्या रक्ताचा सडा घालील; परंतु परधर्मीयांच्या संपर्कानं तें केव्हांही दूषित करणार नाहीं. म्हणे हिंदूंची अंधश्रद्धा ! मूर्खा, कोणत्या धर्मातील श्रद्धा अंध नसते ? श्रद्धेला डोळे फुटले असते तर तुझ्यासारख्या नरपशूलाही शिंगं फुटलेलीं, त्या डोळस श्रद्धेनं कौतुकानं पाहिलीं असतीं. बाबारे, जसा ज्याचा भाव तसा त्याचा देव ! तुझ्यासारख्या श्रद्धाविहीन पाषाणहृदयी पुरुषाला, पाषाणांत परमेश्वराचं स्वरूप दिसणार कसं ? तेंच या माउलीचं प्रभुप्रेम पहा; हीच तिची अंधश्रद्धा पाषाणांतूनही परमेश्वर निर्माण करील !

जटाशंकर—( स्वगत ) या तुळसीदासाच्या वाणींत कांहीं जादू आहे खास ! हा मला इतका टाकून बोलतो आहे, पण याला एकदम देहान्तशिक्षा द्यावी असं माझ्या मनांत येत नाहीं. छेः असल्या भाषेच्या ओघांत सांपडून गटंगळ्या खाण्याइतका मी कमकुवत नाहीं. (प्रकट) बाई, तुमच्या या अंधश्रद्धेचा फोलपणा जगजाहीर व्हावा म्हणून या तुलसीदासाची शिक्षा मी अर्धी घटिका तहकूब ठेवतो. काय तुमचा कौल लावायचा असेल तो लावा. हा फत्तराचा मुरलीधर काय करतो तेंच मला पहायचं आहे.

शरयू—महाराज, सत्कर्म करायचं, तें वाईट भाषेनं कां करावं ? आपले अनंत उपकार झाले; आपलं देव कल्याण करो. तुलसीदासमहाराज, या आपल्या भोळ्याभाबड्या बहिणीची विनंति मान्य करा आणि या मुरलीधर गोपाळ कृष्णापुढं आपलं गाऱ्हाणं सांगा. श्रीकृष्ण आपला योग्य निवाडा करून कौल देतील. हें पाहा, माझ्या भक्तिभावानं मंत्रून हीं फुलं, मी देवाच्या मस्तकावर ठेवतें.

तुलसीदासः—नाहीं–मी अनन्यदैवत आहें. प्रभु रामचंद्रावांचून इतर कोणत्याही दैवतापुढं माझं मस्तक नमलं नाहीं. प्रभो रामराया, भक्तकामकल्पद्रुमा, या अनन्यशरण दासाची लाज तुम्हांला! भक्ताच्या एकनिष्ठेचं कोड पुरवणं हें आपलं ब्रीद आहे. प्रभो कोदण्डपाणि रामचंद्रा! आपल्या धनुर्धर सुंदर स्वरूपाव्यतिरिक्त या तुलसीदासाच्या नेत्रांनीं दुसरं कसलंही ध्यान पाहिलंच नाहीं. आपलं हें मुरलीधर स्वरूप नितांत मनोहर असूनही, या अज्ञानी दासाच्या मनाला तें यावेळीं धीर देत नाहीं. प्रभो, या तुलसीदासाच्या एकनिष्ठेकरितां नव्हे–पण आपल्या विमल चारित्र्याच्या यशोविस्ताराकरितां, स्वतःच्या रक्तानं अखिल स्त्रीजातीला उज्ज्वल करणाऱ्या माझ्या कलेच्या प्रेमाकरितां तरी, आपण धनुष्यबाण हातीं घेऊन माझ्या पातकांचा निःपात करा. प्रभो! माझी हांक अद्यापि ऐकूं आली नाहीं ! काय–इतके दिवस केलेलं प्रभूचं यशोगान व्यर्थ झालं! रामचंद्रा! आपण दर्शन देऊन मान्यता दिल्यावांचून, माझ्या कलेच्या–आपल्या भक्ताच्या रक्तानं माखलेलं हें आपलं चरित्र कोण मान्य करणार ? [ मुरलीधर कृष्णाची मूर्ति अदृश्य होऊन त्या ठिकाणीं धनुर्धारी रामचंद्राची मूर्ति प्रकट होते व गंभीर देववाणी होते.—" भक्तराज तुलसीदास, माझं चरित्र भक्तांच्या रक्तानं केव्हांही माखलं जाणार नाहीं. माझ्या भक्तांच्या रक्तांतून माझं प्रेम–नव्हे–प्रत्यक्ष मीच विहार करीत असतों. या महासाध्वी कलावतीच्या रक्तानं तूं रामायण पूर्ण केलंस, परंतु तें तुझं लेखन नव्हतं, किंवा तें तुझ्या कलेचं रक्तही नव्हतं. ती माझ्या मान्यतेची नाममुद्रा आहे. भक्तराज! तुझी कला जिवंतच आहे आणि तुझ्या भक्तीचा व ग्रंथाचा दिगंत गौरव झालेला पाहून, शेवटीं ती तुझ्याप्रमाणेंच माझ्या स्वरूपांत येऊन मिळेल."]

[ कलावती उठते व मूर्तीच्या पायांवर डोकें ठेवते; मूर्ति पूर्ववत् मुरलीधरस्वरूप धारण करते.]

कलावती—नाथ! प्रत्यक्ष प्रभु रामचंद्रांनीं आपल्याला दर्शन दिलं! प्रभूची दिव्यवाणी मीं त्यांच्या पायांजवळ बसूनच ऐकली! तें आपलं प्रभु-मुद्रांकित रामायण कुठं आहे? (रामायण हृदयाशीं धरते.) अहाहा! मी आज धन्य झालें! माझ्या पतींना प्रत्यक्ष प्रभु रामचंद्रांनीं "भक्तराज" ही पदवी दिली!

३४ पद

प्रभुनाममुद्रांकिता ही कथा। पतिनाम नेईल आतां दिगंता॥ ध्रु०॥ प्रभु धावला। भावा भुकेला। उभा ठाकला। हांक कानींच येतां। अनुरागयुतां तनुयागरतां मनुजां मिळे जनिं सार्थकता॥ १॥

महाराज! आतां आपल्या प्रेमाचं पाहिजे तें कोडकौतुक पुरवायला ही द तयार आहे. अंगीकृत कार्य तडीला नेण्यासाठीं पुरुषांना झालेल्या श्रमाचा परिहार, स्त्रियांनीं आपल्या प्रेमळ सेवनेंच केला पाहिजे.

जटाशंकर—काय हा श्रद्धेचा आणि भक्तीचा प्रभाव! प्रत्यक्ष परमेश्वराला प्रकट व्हावं लागलं! भक्तराज तुलसीदास! आपल्या प्रभावामुळं माझ्या-सारख्या महापातक्याचाही आज उद्धार झाला. (साष्टांग नमस्कार घालतो.)

दीनबंधु—भक्तराज, आपण धन्य आहांत. प्रभूंनीं आपणास दिलेल्या "भक्त-राज" या पदवीपुढें, "राजाबहादुर" या पदवीची मला काडीचीही किंमत वाटत नाहीं. यापुढें आपल्या चरणाचा दास म्हणवून घेण्यांतच मी आजन्म धन्यता मानीन. अधम वासनेला बळी पडून, आपल्या आणि कलेच्या संसारांत माती कालविण्याचा मीं आजपर्यंत आटोकाट प्रयत्न केला. माझ्यासारखा अधमाधम मीच. यानंतर मीं काय बोलूं? आपला उभयतांचा सुखाचा संसार पाहण्याचं भाग्य मला लाभावं, एवढीच आपल्या चरणीं पदर पसरून प्रार्थना आहे. आतां हे वनवासाचे कष्ट सोडून माझ्या घरीं चलावं.

कलावती—बाबा, मी नमस्कार करतें. या महात्म्यामुळं आपलाही उद्धार झाला. नाथ, बाबांच्या विनंतीला मान देऊन आतां घरीं चलावं.

तुलसीदास—गुरुमाउली, प्रभुदर्शनानं पावन झालेल्या तुझ्या आणि माझ्या जीवांना, पुन्हा या संसारगर्तेत कशाला लोटून देतेस?—

३५ पद

**लोटिसी कासया? मातें। पुनरपि भयदभवपाशीं या ॥ध्रु०॥**
**देऊनी दर्शन। प्रभुवरें नाशिल्या वासना। हृदयींच्या**
**नुरलि लवहि जीवांस आस या ॥ १ ॥**

वेषयवासनेनं उच्छृंखल होऊन तुझ्या भेटीकरितां, मी जिवंत कालसर्पावरून वढून गेलों, त्या वेळच्या तुझ्या दिव्य उपदेशानं माझे डोळे उघडले. तुझ्या-रखी प्रेमळ, तरुण व मोहक पत्नी सन्निध असतांना देखील, स्वतांची मानता भंग न पावूं देतां, हें महाकाव्य पूर्ण करण्याची पात्रता माझ्या यीं आली हें केवळ त्या तुझ्या उपदेशाचं फळ.

कलावती—नाहीं, आपल्या अंतर्यामीं रुजलेल्या प्रभुभक्तीच्या बीजाचं हें फळ!

तुलसीदास—पुण्यफल पदरांत पडण्याच्या ऐन संधीला, पूर्वसंचितामुळं माझी चित्तवृत्ति पुन्हा चळली! अंगीकृत कार्याचा विनाश म्हणजे पुरुषांच्या चारित्र्याचा अंतकाळ व चारित्र्यहानि हाच पुरुषांचा मृत्यु! आणि हा माझा मृत्यु टाळण्याकरितां, तूं स्वतः सती सावित्रीप्रमाणं, देवाघरीं जाऊन माझ्या प्रभूला इथं घेऊन आलीस आणि माझ्या प्रभुरायांनीं आपल्या भक्ताचं चोज पुरविण्याकरितां इथं येण्याचे कष्ट घेतले! या महद्भाग्यानंतर, पूर्वसंचिताचा क्षय होऊन हा मानवी देह पंचत्वाला मिळेपर्यंत, प्रभुनामाचा महिमा गाऊन त्या मार्गानं, परधर्मीयांच्या आणि परसत्तेच्या संतत प्रहारामुळं बलहीन झालेल्या आर्यधर्माला, उज्ज्वल नवजीवन देणं हेंच आतां माझं जीवितकर्तव्य आहे. गुरुपदावर मीं तुला पूर्वीच अधिष्ठित केलं आहे; आता संसारांतील हीन सुखं उपभोगण्याकरितां, तुला त्या उच्च पदावरून खालीं ओढण्याचं पातक माझ्या हातून कधींही होणार नाहीं. आणि त्याचप्रमाणं प्रभुप्रेमांत मग्न होऊन काळ कंठणं हेंच तुझ्यासारख्या असामान्य स्त्रीचं कर्तव्य आहे. हा तुझा मदनमोहन आणि तूं या रामायणाची अखंड पारायणं करून प्रभु-यशाची ग्वाही दिगंत गाजवा. प्रभु रामचंद्र तुम्हाला सद्गति देवो.

कलावती—आपली ही दिव्य आज्ञा आपल्या मूर्तीसह निरंतर मी माझ्या हृदयांत वागवीन. महाराज, आपल्या सहवासामुळं माझी जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटका झाली. आपल्याला मी किती धन्यवाद देऊं!

मदनमोहन—महाराजांचं हें रामायण चित्रमय करण्यांत माझं सर्व आयुष्य मी खर्ची घालीन. आपल्यामुळं माझ्या कलेचं सार्थक झालं, मी आपणांला किती धन्यवाद देऊं!

तुलसीदास—सर्व धन्यवाद प्रभु रामचंद्रचरणीं अर्पण असोत.

सर्व—श्रीरामचंद्र की जय! श्री तुलसीदासमहाराज की जय?

कोरस

आरती श्रीरामायण कीं। कीरति कलित ललित सिय-पोकी ॥ ध्रु०॥ गावत ब्रह्मादिक मुनि नारद। वाल्मीकि-विज्ञान-विशारद। शुकसनकादि शेष अरु नारद। बरनि पवनसुत कीरति नीकी ॥ १ ॥ कलिमलहरनि विषयरस फीकी सुभग शृंगार मुक्ति युवतीकी। हरनि रोग भव भूरि अमीकीतात मात सब बिधि तुलसीकी ॥ २ ॥

[ तुलसी-भक्तकृत.]



पुरवणी

पृष्ठ ६० वरील शेवटच्या दोन ओळींच्या पूर्वी—

पद

मज गमला जन्म सार्थ झाला। काव्यदेवता मोहुनी मजला। दावि ललित लीला, या काला ॥ ध्रु० ॥ काव्य-कला मूर्तिमती बाला। रसतरंगि बुडवी काव्याला ॥ १ ॥